


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






## अनुक्रम



**प्रकाशन :** त्रैमासिक ( जानेवारी, मार्च, जून, ऑक्टोबर )

**संपादन समिती :** अशोक रा. केळकर ( प्रमुख ), कल्याण काळे, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** ए–२ परिमल, १२३९–ए आपटे रस्ता, पुणे ४११००४ ( दूरध्वनी ५९२५८ )

**व्यवस्थापकीय संपर्क व पैशाचा भरणा :** चिटणीस, मराठी अभ्यास परिषद, १।८ आगरकर नगर, पुणे ४११ ००१ ( फोन ६३४९६, शिवाय फोन ५४०६९ )

**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पहा.

**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच असे नाही.

संपादक : अशोक रा. केळकर / प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी प्र. ना. परांजपे / मुद्रणस्थळ : संजीव मुद्रणालय, ४६९ सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३.

संपादकीय

# मराठीचं शुद्धलेखन

मराठीचं शुद्धलेखन ही एक समस्याच होऊन बसलेली आहे. आपल्या शिक्षित समाजात शुद्धलेखनाच्या संदर्भात चार प्रकारचे गट आढळून येतात. शुद्धलेखनाची फारशी फिकीर न बाळगणारे सर्वसामान्य लोक. हा गट संख्येने मोठा आहे. दुकानाच्या पाट्या, निमंत्रणपत्रिका, खाजगी पत्रव्यवहार, लहान शहरातील वृत्तपत्रं इ. लेखनव्यवहारात या गटाचं अस्तित्व जाणवतं. दुसरा गट शुद्धलेखनाविषयी आस्था बाळगणारांचा असून त्यात पुन्हा रुचिभेदाने पारंपरिक शुद्धलेखनाचे पुरस्कर्ते व महामंडळपुरस्कृत शुद्धलेखनाचे पुरस्कर्ते असे दोन स्थूल उपगट पडतात. पहिल्या उपगटातही आणखी उपउपगट असण्याची शक्यता आहे. पण संख्येने हा सर्वच उपगट अतिशय लहान असल्याने त्यातील लहान गटांचा विचार केला नाही तरी चालण्यासारखं आहे. तिसरा गट शुद्धलेखनाचे सर्वमान्य नियम पाळत असला तरी या नियमांत सुधारणा सुचविणारा आहे. अर्थात फरक पडत नसेल तेथे शुद्धलेखनात विशिष्ट चिन्हांचा आग्रह धरू नये. (उदा० ऱ्हस्व-दीर्घ इकार-उकारांचे लेखन), संस्कृत लेखन पद्धतीचं दडपण बाळगता कामा नये अशी मतं या गटातर्फे मांडण्यात येतात. चौथ्या गटाचं मत तिसऱ्याप्रमाणेच प्रचलित व्यवस्थेत सुधारणा सुचवणारं असून 'बोलण्याप्रमाणे लिहावे' या मताचा पुरस्कार हा गट करतो आहे.

या संदर्भात येथे विचार करायचा आहे. भाषा ही एक ध्वनिचिन्हांची बनलेली संकेत व्यवस्था आहे. भाषेतील ध्वनी हे चिन्हरूप असून त्यांचं काम आशयाचा निर्देश करणं हे आहे. तो उद्देश साध्य झाला की, चिन्हांचं महत्त्व संपतं. या दृष्टीने आशयाचा निर्देश अबाधितपणे होत असेल तर त्यासाठी आवश्यक असलेल्या ध्वनींच्या वापरात थोडा ढिसाळपणा आला तर फारसं बिघडण्यासारखं नसतं. म्हणून नित्याच्या भाषणव्यवहारात अगदी काटेकोरपणा बाळगला नाही तरी चालण्यासारखं असतं. पण आशयाच्या निर्देशात विक्षेप येईल अशी शक्यता दिसून येताच आपण सावध बनतो व ध्वनिरूप चिन्हांचा वापर अधिक काटेकोरपणे करण्याची दक्षता घेतो. जेव्हा, केवळ आशयाचा निर्देश हेच प्रयोजन नसून हा निर्देश अधिक परिणामकारकतेने व्हावा अशी इच्छा असते तेव्हा आपण या ध्वनिरूप चिन्हांचा वापर अधिक सावधतेने निवड करून करत असतो.

लेखनव्यवहार हीदेखील एक संकेतव्यवस्थाच आहे. ती लिपिचिन्हांची बनलेली असते. भाषणव्यवहारातील ध्वनिरूप चिन्हांचा बोध करून देणं हे या लिपिचिन्हांचं कार्य असतं. म्हणजे लेखनव्यवस्था ही ध्वनिरूप चिन्हांच्या व्यवस्थेवर आधारलेली अशी एक दुय्यम व्यवस्था आहे. लिपीतील अक्षरं चिन्हरूप असल्याने त्यांचंही प्रयोजन ध्वनि-

चिन्हांचा बोध करून देण्याशी थांबतं. हा बोध विनाविक्षेप होत असेल तर लिपि-चिन्हांच्या वापरातही थोडासा ढिसाळपणा आला तरी चालण्यासारखं असतं. म्हणून सर्वसामान्य व्यवहारातील थोडंफार चुकीचं लेखन क्षम्य मानायला हरकत नाही. मात्र या बोधनिर्देशाच्या कार्यात विक्षेप येत असेल तेथे मात्र लेखनव्यवहार अधिक सावधतेने करणं इष्ट असतं.

भाषणव्यवहारात श्रोता हा वक्त्याच्या समोर उपस्थित असतो. त्यामुळे त्याच्या प्रति-क्रियांवरून श्रोत्याला आपण भाषणव्यवहारात केलेल्या शिथिल प्रयोगांच्या क्षम्यतेचा अंदाज येतो व तो त्याला अनुसरून भाषणव्यवहारात दक्षता बाळगू शकतो. पण लेखनव्यवहारात वाचकवर्ग हा समोर उपस्थित नसतो. पत्र, चिठ्ठी यांची गोष्ट सोडली तर तो मर्यादित नसून सर्वत्र विखुरलेला असतो, एका काळाशी निगडित नसतो, तसेच कित्येकवेळा तो अज्ञातही असतो. अशा ज्ञात–अज्ञात, स्थलकालसंकीर्ण अशा वाचक-वर्गासाठी लिहिणाऱ्या लेखकाला लेखनात जास्त शिथिलपणा दाखवायला वाव नसतो. त्याला सर्वमान्य संकेतांना धरूनच लेखन करावं लागतं. सर्वसामान्य व्यवहारापेक्षाही जेथे विशेष व्यवहारासाठी म्हणून लेखन करावं लागतं अशा वाङ्मयलेखनाच्या बाबतीत तर खूपच दक्षता घेणं आवश्यक असतं.

'आता उच्चारानुसारी लेखन करावं' अशी अपेक्षा काहीजण बाळगतात. पण स्वतःच्या उच्चारांची जाणीवपूर्वक दखल घेण्याची आवश्यकता कितीजणांना वाटत असते? अनेकांच्या बाबतीत असं दिसून येतं की त्यांना आपल्या उच्चारातील ऱ्हस्व दीर्घ भेद कळतच नाही. त्यामुळे उच्चारानुसारी लेखन याला सर्वसामान्य व्यवहारात काही अर्थच राहात नाही. 'मी' 'तू' या शब्दांचं लेखन उच्चारानुसारी असूनही अनेकजण 'मि' 'तु' असंच करताना आढळतात. दुसरं असं की उच्चारानुसारी लेखनाचा कितीही उद्घोष केला तरी कालांतरानं लेखन व भाषण यांच्यात अंतर पडत जातंच. लेखन हे बरंचसं स्थितिप्रिय असून भाषण हे गतिप्रिय असतं. त्यांची एका विशिष्ट काळात सांगड घातली तरी कालांतरानं त्यांच्यात तफावत पडतेच. मग लेखन-व्यवहाराचेही संकेत बनत जातात. लेखनातले हे संकेत म्हणजे 'स्पेलिंग' होय. जगातल्या लिपिव्यवस्था असलेल्या सर्वच भाषांमध्ये ही स्पेलिंगव्यवस्था आढळते. मराठीतही ही स्पेलिंगव्यवस्था आहे, असं स्वीकारलं तर शुद्धलेखनासंबंधी वाद घालण्याची फारशी जरूर पडणार नाही. इतर भाषांच्या स्पेलिंगचा आपण जसा बिनतक्रार स्वीकार करतो, तसाच मराठीच्याही स्पेलिंगचा केल्यास शुद्धलेखनाचा काच जाणवणार नाही.

कल्याण काळे

# भाषांतर : छायानुवाद की भावानुवाद ?

## गौरी देशपांडे

भाषांतर आणि भावानुवाद हे दोन शब्द नेहमी जोडीने उच्चारले जातात. इतक्या अपरिहार्यपणे त्यांचा उल्लेख एकत्रित करावा लागतो यावरून या दोन्हीसंबंधीचा गोंधळ किती खोलवर जाऊन रुजला आहे ते लक्षात येईल. बिचाऱ्या छायानुवाद करणाऱ्या भाषांतरकर्त्याचं महत्त्व जगाला एकदा समजावून सांगायला हवं आहे. अचूक छायानुवाद साधण्यासाठी जीवाचं रान करणारा भाषांतरकर्ता कसे कष्ट घेतो हे पाहिलं तर दिसेल की, कधी एखाद्या बारीकशा अर्थच्छटेसाठी तासभर नखं कुरतडतोय, तर कधी एखाद्या वाक्प्रचाराच्या भाषांतरावर अडून स्वतःचं डोकं खाजवतोय, आणि कधी एखाद्या शब्दाला सुयोग्य प्रतिशब्द सापडत नसल्याने रडकुंडीला आलाय. इतके परिश्रम घेणाऱ्या माणसाचं महत्त्व नीट समजावून ध्यायचं असेल तर प्रथम भावानुवादकर्ता या प्राण्याला वेचून बाजूला काढायला हवा आणि त्याचे दोष कठोरपणे उघड करायला हवेत. भाषांतरकर्ता हा ' अहं ' ला जिंकून खरोखर इतक्या वस्तुनिष्ठपणे काम करत असतो की, निर्वाणाप्रत पोचण्यासाठी ' अहं 'ला विसरण्याची जी एक स्थिती तत्त्ववेत्ते आवश्यक मानतात तीच जवळपास त्याने साध्य केलेली असते असं म्हणायला हरकत नाही. भाषेच्या अंतर्गत अन्य कुठलाही शास्त्रीय किंवा साहित्यिक व्यवहार पार पाडण्यासाठी एवढ्या प्रमाणात ' अहं ' ला विसरण्याची गरज पडत नसावी. चांगलं भाषांतर साधण्यासाठी स्वतःला दुसऱ्याच्या व्यक्तिमत्त्वात खेचून नेऊन त्या दुसऱ्या व्यक्तीच्या बुद्धी, भावना आणि शब्दकळेत विलीन व्हावं लागतं. स्वतःची जी काही भावनात्मक जडणघडण असेल ती विसरून स्वतःचं दोन्ही भाषांचं आणि संस्कृतींचं समग्र ज्ञान सर्व शक्तीनिशी भाषांतरासाठी हाती घेतलेल्या कृतीवर पणाला लावावं लागतं. आता ही एक आदर्श गोष्ट असल्याने ती सहसा पूर्णपणे जमत नाही. तरीपण ज्या लेखकाची कृती भाषांतरित व्हायची असेल त्याला आपल्या कृतीचं भाषांतरच व्हावं, भावानुवाद नको असा आग्रह धरण्याचा हक्क असायला हवा. कारण भावानुवाद ही एक सोयिस्करपणे केली जाणारी ' गोळाबेरीज ' स्वरूपाची चीज आहे. किंवा ' अहं ' संपूर्णपणे बाजूला न ठेवू शकणाऱ्या अहंमन्य भाषाकर्म्याची चलाखी म्हणजे भावानुवाद असं म्हणता येईल. प्रत्येक शब्द आणि प्रत्येक संकल्पना नेमकेपणाने दुसऱ्या भाषेत आणण्यासाठी शक्य ते सर्व करावं अशी त्याची धारणाच नसते. लेखकाला ढोबळ मानाने काय म्हणायचं आहे ते दिलं की काम झालं अशी त्याची वृत्ती असते. ह्यातला आणखी वाईट भाग म्हणजे त्याचं स्वतःचं व्यक्तिमत्त्व सतत लेखक आणि वाचक यांच्यामध्ये घुसत असतं. मूळ लेखकाला हे, हे आणि हे म्हणायचं आहे असं सरळ न सांगता

'त्याला असं म्हणायचं असाव असं मला वाटतं' असं तो सतत म्हणत असतो. त्यामुळे इकडे तिकडे लीलया शब्द उधळत कथा, कवितांचं, इतकंच नव्हे तर विवेचनग्रंथांचं देखील सहज रूपांतर करून टाकणाऱ्या भावानुवादकर्त्यापेक्षा प्रदीर्घ विचक्षणा करून कसेबसे एक-दोन शब्द हातावर टेकवणारा कंजूष, खरखरमुंड्या भाषांतरकर्ता परवडला असं मला वाटतं.

भाषांतर ही एक विलक्षण काटेकोर कला आहे. इथे भाषांतर करणाऱ्याचं त्याच्या विषयातलं आणि दोन्ही भाषांचं ज्ञान याचा तर कस लागतोच पण त्याचा दोन्ही भाषिक-समूहांच्या संस्कृतींचा, साहित्याचा, आणि इतिहासाचा अभ्यास किती खोल आणि अचूक आहे याचाही कस लागतो. माणसाच्या जीवनाचं प्रत्येक अंग नियंत्रित करू पाहणाऱ्या सर्वंकष सत्तेखाली राहण्याचा अनुभव नसेल किंवा मार्क्स नावाच्या एका माणसाने ते तत्त्वज्ञान मांडलं त्यामुळे रशियाच्या इतिहासाने एक महत्त्वाचं वळण घेतलं हे माहीत नसेल तर सोल्झेनित्सिनच्या एखाद्या कलाकृतीचं भाषांतर यशस्वी होणं कठीण आहे. विशेषतः ललितकृतीचं भाषांतर करताना तिच्या लेखकाचं समग्र साहित्य, त्याचा भावनिक वैचारिक 'परिसर', त्याच्यावर ज्याचा ज्याचा परिणाम झाला, आणि त्याच्या निर्मितिक्षमतेला ज्या कशामुळे चालना मिळाली त्या सर्व गोष्टी, घटना, व्यक्ती यांची संपूर्ण माहिती असायला हवी. लेखकाशी प्रत्यक्ष चर्चा करणं शक्य असेल तर उत्तमच. नाहीतर निदान पत्रव्यवहाराने त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा परिचय करून घ्यायला हवा. एखादी कविता आवडली म्हणून झटक्यासरशी तिचं 'भाषांतर' कागदावर उतरवलं तरी ते खरंखुरं भाषांतर असणार नाही. रूपांतर किंवा भावानुवाद असेल. आणि हौस, छंद फावल्या वेळची करमणूक या सदरात जमा करावं लागेल. भाषांतर हे ललितकृतीच्या निर्मितीपेक्षाही जास्त तणावाचं आणि जोखमीचं असतं. दोन्हीसाठी विशिष्ट जन्मजात आकलनाची गरज असतेच. पण स्वतंत्र निर्मितीसाठी स्फूर्तीची म्हणा, प्रतिभेची म्हणा, देणगी घेऊन जन्माला यावं लागतं. भाषांतरकर्ता स्वतः निर्मितिक्षम लेखक नसला तरी चालू शकतं. ललितकृतीच्या निर्मितीची प्रक्रिया अनुभवलेली असणं चांगलंच, पण त्याशिवायही भाषांतरकर्ता काम करू शकतो. किंवा खरं म्हणजे स्वतः स्वतंत्र लेखक असणं अडचणीचंच ठरण्याची शक्यता असते. त्याच्या स्वतःच्या प्रतिभेचा, निर्मितिक्षमतेचा आविष्कार होऊ लागला तर भाषांतराच्या क्रियेमधे विक्षेपच येईल. भाषांतरकर्त्याच्या अन्य काही गुणांची नोंद करायची झाली तर अचूकपणाचा आग्रह, लहानात लहान तपशीलाकडेही लक्ष, विवेकी, विनम्र वृत्ती वगैरे सांगता येईल. भाषेची जाण हा आवश्यक गुण थोडाफार दैवी देणगी या सदरात मोडणारा. बाकी सर्व गुण चिकाटीने आपल्या अंगी बाणविण्यातले आहेत. कारण... भाषांतर हा एक प्रेमाखातर आणि हौसेखातर करण्याचा खटाटोप आहे आणि प्रेमविषयासाठी कष्ट घेणं, झीज सोसणं हे आपण मानतोच.

तर दोन्ही भाषांविषयी वाटणारं प्रेम इथून ह्या खटाटोपाला सुरुवात होते. ललित साहित्य या प्रकाराबद्दल आस्था असली किंवा एखादा लेखक, एखादा विषय फारच जिव्हाळ्याचा वाटायला लागला की आपण भाषांतराला हात घालतो. आणि ह्या जिव्हाळ्याच्या जोरावरच त्यातूनच पार पडतो. मात्र पार पडताना कष्ट आणि परिश्रम अटळ आहेत.

भाषांतरकार म्हणून जे मान्यता पावलेले आहेत, त्यांनी स्वतःचं असं फारच थोडं लेखन केलेलं आहे. त्यांची भाषांतरं हीच वाचकाला कसदार, प्रत्ययकारी अनुभव बनून राहिलेली आहेत. ग्रीक, लॅटिन आणि रशियन साहित्य हे जणू इंग्रजी साहित्याचाच भाग असल्याप्रमाणे आमच्या पिढीने वाचलं. याचा अर्थ मुळात जेव्हा कधी ते इंग्लिश-मधे भाषांतरित होऊन आलं तेव्हा त्याने आपल्या वैभवाने इंग्रजी वाचकाला स्तिमित करून सोडलं असणार. हे श्रेय भाषांतरकर्त्यांचंच ना ? लघुकथा हा प्रकार तर इंग्लिश साहित्यात रुळला तो पुश्कीन आणि तुर्गेन्येव यांच्या अगणित लघुकथा इंग्रजीत आणण्याची शक्यता बरोबर ओळखली गेली म्हणूनच.

मला माहीत असलेल्या एका प्रचंड आवाक्याच्या भाषांतरकर्त्याचं उदाहरण इथे देता येईल; ते म्हणजे सर रिचर्ड बर्टन. त्याने केलेलं 'अरेबियन नाईटस्' हे भाषांतर हे एकप्रकारे स्वतःला भावानुवादकर्ता म्हणवणाऱ्यांवरचं आरोपपत्रच ठरेल. त्याचं एखादं अतिशय चपखल भाषांतर वाचल्यावर या टिकाणी दुसरा कुठला शब्द चालला असता असा विचार करते तेव्हा मला सुचणारा प्रत्येक पर्याय मीच फेटाळून लावते. इतकी त्याची कामगिरी अजोड आहे. अरबी भाषेतल्या 'कलेजा' किंवा 'जिगर' या शब्दाचं त्याने केलेलं भाषांतर पाहू. अरबी भाषेत आणि काही भारतीय भाषांमधेसुद्धा आपल्या पोटच्या मुलाला प्रेमाने काळजाचा तुकडा / कलेजे का टुकडा म्हटलं जातं. एखाद्याने या जागी dearest, darling (प्रिय, जीवलग) असा पर्याय मानला असता. किंवा my life, my heart (माझं सर्वस्व, माझा प्राण) असे शैलीभंग करणारे शब्द घेऊन ते भाषांतर हास्यास्पदच करून ठेवलं असतं. पण हे झिजून जीर्ण झालेले शब्द बर्टनला अर्थातच चालण्यासारखे नव्हते. 'कलेजे का टुकडा' या शब्दसमूहाला असलेला ऐति-हासिक, शरीरवैज्ञानिक संदर्भ त्यामुळे गळून पडला असता. जुन्या पौर्वात्य शरीररचना-शास्त्रात कलेजा (म्हणजे यकृत liver) हे सुरतविषयक कोमल भावनांचं उगमस्थान मानलं जातं. त्यामुळे मुलाला कलेजाचा तुकडा म्हणणं हे विशेष उचित ठरतं. त्यातून ह्या उपमेला अनुस्यूत अशा मुलाशी असणाऱ्या शारीरिक पातळीवरच्या बंधाचा ठाशीवपणे निर्देश होतो. सर्वच पौर्वात्य समाजात मुलांना अंगाशी जवळ घेऊन, प्रत्यक्ष स्पर्शातून त्यांच्याशी आजही लडिवाळपणा जोपासला जातो. पाश्चिमात्य समाजाला, विशेषतः बर्टनकालीन समाजाला या प्रकारच्या भावसंबंधांची कल्पना समजण्यासारखी नव्हती. इंग्लिश मनाला तर लिव्हरचा संबंध फक्त खाण्याशी माहीत होता. बेताच्या कुवतीच्या

माणसाने या ठिकाणी भावानुवाद करण्याच्या सोयीचा आश्रय घेऊन आणि थोडे कष्टपूर्वक काम करणाऱ्याने एक स्पष्टीकरणात्मक तळटीप देऊन काम भागवले असते. ( बर्टन परिपूर्णतेचा भोक्ता असल्याने स्वतःसुद्धा तशा तळटीपा देतच असे म्हणा ! ) या ठिकाणी बर्टनने मात्र अक्षरशः लढाई दिली. शारीरिक पातळीवरच्या जीवनाशी संबंधित अशा मानवी अवयवांची सर्व नावं जमवून त्यांची आलोचना झाली. आणि vital organs, vitals (मर्मस्थान ) हा पर्याय त्याने निवडला. You have torn away a piece of my liver (तू माझ्या काळजाचा लचका तोडला आहेस ) याऐवजी You have torn away my vitals असं लिहिलं. Your going away has lit a fire in my liver ( तुझ्या जाण्याने माझ्या कलेजात आग पेटली आहे ) याबद्दल Your going away has set my vitals afire. ( तुझ्या दूर जाण्याने माझ्या मर्मस्थानी दाह झाला आहे) असा पर्याय स्वीकारला.

या जागी heart हृदय हा पर्याय चालण्यासारखा नव्हता का ? नव्हता. कारण एक तर मूळ शब्दातला जोर नाहीसा झाला असता. त्यातली प्रतिमा आणि तद्दन शारीर संदर्भ गळून पडला असता. Vitals (मर्मस्थान)ला मूळातल्याएवढा जोर नसला तरी त्यातलं नावीन्य महत्त्वाचं होतं. आणि दुसरं कारण अतिशय सरळ आहे. अरबी भाषेत हृदयाला शब्द आहेच. तो अर्थ अभिप्रेत असता तर मूळ लेखकाने हृदय शब्दच वापरला असता. तसं ज्या अर्थी नाही त्या अर्थी कलेजा / जिगर च्या जागी हृदय वापरणं अप्रामाणिकपणा होईल.

जिज्ञासूंनी बर्टनने 'Khaleefah and the Fisherman' ह्या गोष्टीचं दोन वेगळया प्रकारे केलेलं भाषांतर वाचून पाहावं; म्हणजे त्याच्या भाषांतरकौशल्याच्या महनीयतेचा अनुभव येईल. MacNaughten आणि Breslau या दोनही आवृत्त्यां मधे ही गोष्ट आलेली आहे. दोन्हींत तपशिलाचा आणि शैलीचा भेद अतिशय मार्मिक-तेने सांभाळला आहे. मॅक्नॉटन आवृत्तीतली गोष्ट ही मौखिक निवेदनाच्या पठडीतली, विस्कळित बांधणीची, आणि तार्किक सुसंगतीचा बाऊ न करता सांगितलेली, थोडक्यात श्रोत्यांसाठी. ब्रेस्लाऊ आवृत्तीतली गोष्ट चटपटीत, कौशल्यपूर्वक रचलेली, साहित्यिक समीक्षेच्या अपेक्षांना उतरेल अशी, म्हणजे थोडक्यात जाणकार वाचकांसाठी.

' अरेबियन नाईट्स् 'चं मराठी भाषांतर करताना मी बर्टनच्या निम्म्याने तरी यशस्वी झाले असेन अशी आशा करते.

शुद्ध विज्ञान आणि मानव्य शाखेची शास्त्रे वगळता ललित साहित्याच्या प्रांतात भाषांतर टाळून भावानुवाद बरे म्हणण्याकडे प्रवृत्ती जास्त असते ती बहुतेक हताश-पणातून आणि वैतागातून. परंतु एवढा सहज पराभव पत्करण्याचं कारण नाही. पूर्णतः अविकसित, लिपी नसलेली, संस्कृतीचा आणि साहित्याचा पूर्वसूरींकडून काहीच वारसा न लाभलेली आणि काही सांस्कृतिक परंपराच नसलेली अशी एखादीच, फारतर

आदिवासी टोळीवाल्यांची भाषा असेल. जगातल्या बहुतेक भाषा वरील मुद्यांचा विचार केल्यास तुल्यबळ ठरतील. एखाद्या भाषेत अमूक एका पैलूची उणीव असेल तर दुसऱ्या एखाद्या पैलूची समृद्धी असेल. तेव्हा काळजीपूर्वक थोडी योजकता आणि शोधकता दाखवून काम केल्यास भाषांतर जमेल. या ठिकाणी एका गोष्टीचा उल्लेख मात्र "भाषांतर केवळ अशक्य" असा शरणचिठ्ठी देवूनच करावा लागेल; ती म्हणजे मराठीत लैंगिक विषयावर / सुरतावर अगदी ओबड–धोबड, अश्लील – ओंगळ लिहावं लागतं किंवा कंटाळवाणं संस्कृतप्रचुर ! इंग्लिश किंवा फ्रेंचमधे अगदी रोजच्या व्यवहारातले शब्द वापरून निःसंकोचपणे जसं लिहिता येतं तसं मराठीत सहज जमत नाही. एकाच वेळी सूचक आणि सूक्ष्म तरीही सुस्पष्ट लिहिणं अशक्यप्राय आहे. अरबी भाषेतून मराठीत 'अरेबियन नाईट्स्' आणताना मला या गोष्टीचा तितकासा त्रास झाला नसेल तर त्याचं कारण एवढंच आहे की मूळ अरेबियन नाईट्स्‌चा रांगडा ढंग आणि अश्लीलपणा मराठीच्या वरचढ आहे.

ललित साहित्यात, विशेषतः काव्यात भावानुवादापेक्षा भाषांतर केल्यानेच मूळ लिखाणाला न्याय देता येतो. कारण भावानुवाद हा एक अगदी वैयक्तिक स्वरूपाचा, त्यामुळे विवाद्य ठरणारा आविष्कार असतो. तर भाषांतर हा वस्तुनिष्ठ, भावनिक कल्लोळात न अडकणारा, साक्षेपाने केलेला भाषिक व्यवहार असतो.

सरतेशेवटी मी हे कबूल करते की 'भावानुवाद' कर्त्यांचे सर्व दोष माझ्यात आहेत. तरीपण या दोन भाषिक आविष्कारांची गल्लत होऊ नये म्हणून हे विवेचन ! दोन भाषा आणि दोन संस्कृतींच्यातल्या आंतरक्रियेत भाषांतर हे तर्काने प्रथम येणारे. त्यानंतर पूरक, स्पष्टीकरणात्मक, टीकात्मक स्वरूपात भावानुवादाची जागा आहेच. हे काही एकमेकांचे समान शक्तीचे, समान गुणवत्तेचे पर्याय नव्हेत. एखादी कलाकृती एका कालखंडातून दुसऱ्या कालखंडात अथवा एका संस्कृतीतून दुसऱ्या संस्कृतीत पोचवायची असेल तर ही गोष्ट विशेषत्वाने ध्यानात घ्यायला हवी.

ताजा कलम : वरील निरूपण लिखित शब्दांच्या बाबतीतले आहे. एखाद्या आंतरराष्ट्रीय परिषदेसारख्या ठिकाणी जेव्हा ताबडतोब भाषांतराची गरज असते तेव्हा साक्षेपी भाषांतर शक्य नसते. तिथे गोळाबेरीज स्वरूपाचे भाषांतर करावे लागते हे उघड आहे. मुख्य मुद्दा तात्काळ प्रेक्षकांपुढे ठेवणे हे तिथे महत्त्वाचे असते. म्हणूनच या लोकांना interpreters म्हटले जाते.

**मूल इंग्लिशवरून अनुवाद : अंजनी खेर**

**इतिकथन :** 'ट्रान्स्लेशन् व्हर्सस् इंटर्‌प्रिटेशन' हा निबंध लेखिकेच्या अनुपस्थितीत भाषांतरक्रियेवरच्या एका चर्चासत्रात पश्चिम विभागीय भाषा केंद्र, डेकन कॉलेज, पुणे इथे मार्च १९७९ मध्ये वाचला गेला होता.

**लेखिकेचा पत्ता :** डाकपेटी २३, फलटण ४१५५२३

**अनुवादिकेचा पत्ता :** सी तळमजला, कलाबसंत, ८०८ का. वा. अभ्यंकर रस्ता, पुणे ४११ ००४

# संस्कृत भाषेचें शिक्षण

श्रीधर निमकर

संस्कृत भाषा भारतात कधी काळी बोलली जात होती किंवा नाही याबद्दल बरेच गैर-समज सुशिक्षितांमध्ये आहेत. कोणी म्हणतात संस्कृतसारखी कठीण भाषा कधी कोणी बोलत असेल यावर विश्वास बसत नाही. ती फक्त ग्रांथिक भाषा असली पाहिजे. दुसरे कोणी म्हणतात की ती मूठभर पंडितांची भाषा असावी, सर्वसामान्य जनता ती कधीच बोलत नव्हती. आणखी कोणी असे समजतात की स्त्रियांना आणि शूद्रांना संस्कृत शिकण्या बोलण्याची बंदीच होती. तसेच संस्कृतमधील वाङ्मयात उच्चनीच भावना आणि ब्राह्मण्यवाद जोपासलेला आहे. हे सर्व मतप्रवाह संस्कृतचा अभ्यास आधुनिक काळात आवश्यक नाही असे सुचविणारे आहेत. याउलट काहींचा आग्रह असा दिसतो की संस्कृत भाषा थोड्याशा सरावाने आजही बोलता येईल. ती सर्वांना समजू शकेल. हिंदीला दक्षिणेत तर इंग्रजीला उत्तरेत विरोध होतो तसा संस्कृतला कुठेच विरोध नसल्या-मुळे, आणि संस्कृतमध्ये प्राचीन भारताचा सांस्कृतिक-वैचारिक वारसा जपलेला असल्या-मुळे संस्कृत ही भाषा आज वापरात आणून तिला राष्ट्रभाषेचे स्थान देता येईल ! या मताचे प्रतिपादक संस्कृतचा अभ्यास सार्वत्रिक व आवश्यक व्हावा असे सुचवितात. यांपैकी कोणत्याही मताला ऐतिहासिक वा तार्किक बैठक नसल्यामुळे, संस्कृतविषयक योग्य तो दृष्टिकोन ठरवून तिच्या अभ्यासाविषयी एक निश्चित भूमिका घेणे आवश्यक वाटते. त्यासाठी हा प्रपंच.

संस्कृत भाषा ऐतिहासिक काळात भारतीय समाजात बोलली जात होती यात शंका नाही. याचे उत्तम गमक म्हणजे संस्कृतातले संधी. ‘ गृहं आगतः ’ हे शब्द एका-पाठोपाठ एक असे उच्चारल्यास ‘ गृहमागतः ’ असेच ऐकू येणार. मराठीतही जाऊन आलो ’ हे शब्द चट्कन् ‘ जाऊनलो ’ असेच ऐकू येतात. पण आपण मराठीत जसे बोलतो तसे लिहिण्याची पद्धत नाही. ती संस्कृतात होती. म्हणून संस्कृतात संधी करून लिहीत. हे संधी म्हणजे euphonic combinations किंवा ‘ उच्चारसौकर्यासाठी केलेला स्वरांचा व व्यञ्जनांचा मिलाफ ’ होता. उच्चारसौकर्याची एवढी काळजी बोली भाषेतच घेतली जाणार हे उघड आहे.

इसवी सनपूर्व पाचव्या शतकात होऊन गेलेला संस्कृतचा व्याकरणकार पाणिनि हा ‘ छन्दसि ’ आणि ‘ भाषायाम् ’ असा फरक करतो. त्याच्या काळी दुर्बोध झालेली वेदाची भाषा म्हणजे ‘ छन्दस् ’ आणि त्याच्या काळी सर्वांच्या बोलण्यात असलेली ती ‘ भाषा ’ म्हणजे आज जिला आपण विदग्ध संस्कृत म्हणतो ती ‘ संस्कृत भाषा ’ असा या दोन

शब्दांचा अर्थ आहे. यावरूनही संस्कृत ही लोकांच्या बोलण्यातली भाषा होती हे सिद्ध होऊ शकते.

पाणिनीच्या पूर्वी होऊन गेलेले भगवान् बुद्ध आणि महावीर यांनी सर्वसामान्यांना समजावा म्हणून आपला उपदेश प्राकृत भाषांतून केला त्याअर्थी त्यांच्या काळी संस्कृत ही सामान्यजनांची भाषा नव्हती असा एक निष्कर्ष निघतो. पण तो नीट तपासून घेतला पाहिजे. हे दोघे महापुरुष साधारणतः एकाच काळात झाले आणि त्यांनी शेजार-शेजारच्या राज्यांत आपला धर्मोपदेश केला. असे असताना त्यांचे धर्मग्रंथ वेगळ्या भाषांत आहेत हे कसे ? याचा एकच अर्थ संभवतो तो म्हणजे हे दोघेही ज्या भाषा बोलत होते त्या दोन्ही संस्कृतच्याच प्रादेशिक बोली होत्या. त्यांची शिकवण पुढे तीन-चारशे वर्षांनी ग्रंथनिविष्ट झाली तेव्हा या बोलींना ग्रांथिक भाषेचे स्वरूप प्राप्त झाले.

प्रादेशिक प्राकृत बोलींना ग्रांथिक भाषांचे स्वरूप आणि महत्त्व प्राप्त झाले त्याच काळात नाट्याचार्य भरतमुनी होऊन गेले. म्हणून त्यांनी नाटकातल्या विविध पात्रांनी विविध प्राकृत बोलींतून बोलावे असे संकेत घालून दिले. त्यात स्त्रियांनी महाराष्ट्री प्राकृत बोलावी असा नियम पडला. या संकेतांवरून स्त्रियांना व शूद्रांना संस्कृत बोलण्याची किंवा शिकण्याची मनाई होती असा निष्कर्ष काढणे अगदीच चुकीचे आहे. कारण प्राकृत बोलणाऱ्या स्त्रिया व 'नीच पात्रे' कधी कधी संस्कृतमधून बोलतात. त्यांना संस्कृत संभाषण समजते. आणि जत्रांच्या ठिकाणी प्रेक्षकांमध्ये सर्व वर्णांचे लोक आणि स्त्रियासुद्धा असत व त्यांना संस्कृत नाटके समजत. संस्कृत शिकण्या-बोलण्याची बंदी कधीही कुणालाही नव्हती. (बंदी होती ती फक्त वेद शिकण्याची. ती सार्वत्रिक नव्हती आणि तिची कारणे वेगळी आहेत. पण त्यांची चर्चा येथे अप्रस्तुत आहे.) मात्र एवढे खरे की प्राकृत बोली ग्रंथनिविष्ट झाल्या त्याच्याही पूर्वीपासून बोलण्यातील संस्कृत भाषेत फरक पडत गेला होता. संस्कृत भाषा आकलनीय राहिली पण बोलण्यातून तिचे प्राकृती-करण होत गेले. ह्या स्थित्यंतराचा काळ सुमारे सात-आठशे वर्षे टिकला असावा. पुढे हर्षवर्धनाच्या काळापासून ( इ. स. सातवे शतक) संस्कृत ही पाण्डित्यप्रदर्शनाची आणि म्हणून सामान्यजनांना दुर्बोध भाषा झाली असावी. म्हणजेच भारतीय इतिहासातील एका प्रदीर्घ कालखंडात संस्कृत भाषा सामाजिक दळणवळणाचे साधन होती यात शंका नाही.

पण असे असले तरी त्यामुळे संस्कृत भाषा ही आजही बोलली जाऊ शकते आणि तशी ती व्यवहारात आणणे उपयुक्त ठरेल असे म्हणणे मात्र असमंजसपणाचेच आहे. कारण भाषा ही एखाद्या सजीवासारखी असते. जन्माला येणे, वाढणे, आपल्यासारखे दुसरे सजीव जन्माला घालणे आणि कालान्तराने नष्ट होणे हे सजीवांचे जीवनचक्र आहे. संस्कृत भाषा आज यांपैकी शेवटच्या पायरीवर आहे. संस्कृतात अजून काही लोक लिहू-बोलू शकतात म्हणून ती अजून जिवंत आहे असे म्हणणे दुराग्रहाचे आहे. ज्ञानेश्वरीच्या काळातली मराठी भाषा आज कोणी वापरीत नाही. चॉसर किंवा शेक्सपियर यांच्या

काळातली इंग्रजी आज किंवा पुढे कधीही व्यवहारात वापरली जाणे शक्य नाही. त्याचप्रमाणे आजच्या भारतीय भाषांचे पूर्वरूप असलेली संस्कृत भाषा आज किंवा पुढे कधीही बोलभाषेच्या व्यवहारास योग्य ठरणार नाही. म्हणूनच संस्कृत वक्तृत्वाच्या स्पर्धा घेणे, नवी संस्कृत नाटके लिहून रंगभूमीवर आणणे आणि रेडिओवरून संस्कृत बातम्या सांगणे हे सर्व अनावश्यक व्यापार आहेत. भाषा ही दळणवळणाचे साधन म्हणून सारखी बदलत असते. आजोबांची भाषा नातू व्यवहारात वापरू शकणार नाही. मग हजार वर्षांपूर्वीच्या समाजाची भाषा आजच्या समाजाला वापरायला सांगणे कितपत योग्य आहे ?

एक गोष्ट स्पष्ट आहे की, एखाद्या समाजाची भाषा त्याच्या संस्कृतीशी निगडित असते. संस्कृत भाषा ज्या समाजात वाढली, जोपासली गेली, तो समाज आता खूपच बदलला आहे. संस्कृत भाषा वापरातून नाहीशी झाल्यानंतर त्या समाजात इतर संस्कृतींचे अनेक प्रवाह येऊन मिसळले आहेत. त्यांना अनुरूप अशी स्थित्यंतरे त्या त्या समाजाच्या बोलीभाषेत झाली आहेत. ही स्थित्यंतरे संस्कृत भाषा प्रकट करू शकत नाही. म्हणूनच ‘ विनोबा भावेन भूदानं कृतम् ’ किंवा ‘ मंगला कवठेकरः वृत्तं वाचयति ’ असले ‘ असंस्कृत ’ शब्दप्रयोग खपवून घ्यावे लागतात.

याच कारणास्तव संस्कृत भाषा आज व्यवहारात वापरणे शक्य नाही. आणि ते इष्टही नाही. तर मग तिचा अभ्यास कशासाठी करायचा ? आणि तो कशा प्रकारे केला पाहिजे ? या दोन प्रश्नांची उत्तरे शोधणे आवश्यक ठरते.

भारतीय समाजाची जडणघडण मुळात ज्या विचारप्रवाहांनी केली ते सारे संस्कृतमध्ये प्रथम अवतीर्ण झाले, म्हणून भारतीय समाजाचे मन समजावून घेऊ इच्छिणाऱ्याला संस्कृत भाषा समजली पाहिजे. यासाठी भास कालिदासादिकांची काव्य–नाटकेच नव्हे, तर नेहमीच्या व्यवहारातले मन्त्रतन्त्रसुद्धा त्याने समजावून घेतले पाहिजेत. उदाहरणार्थ जेवण सुरू करताना, ‘ हे अन्नदेवते, तू आम्हाला रोगरहित आणि शक्तिशाली असे अन्न दे, आणि ते देणाऱ्याचे सदैव रक्षण कर ’ हा मन्त्र म्हटला जातो. किंवा प्रसंगी ‘ आम्ही त्या भगवान् सूर्यनारायणाच्या दिव्य तेजाचे चिन्तन करतो; तो आमची बुद्धी तल्लख करो ’ असे गायत्रीमन्त्रोच्चारण, ‘ सगळीकडून आमच्याकडे मंगल विचार येवोत ’ अशा अर्थाचे मन्त्र, वगैरे प्रार्थनांमध्ये ब्राह्मणशाहीचा लवलेशही नाही. उलट ते मन्त्र एका विशाल उदारहृदयी बुद्धिपूजक संस्कृतीचे दर्शन घडवितात. यातील सामाजिक विचार त्याने समजून घेतला पाहिजे. तसेच राजकीय, आर्थिक, करविषयक, स्थापत्यविषयक, शिल्पकलेसंबंधी, नृत्य–संगीतासंबंधी आयुर्वेदविषयक, कामजीवना-संबंधी भारतीय समाजात कोणता मौलिक विचार झालेला होता ते त्या त्या शास्त्रांच्या आणि कलांच्या अभ्यासकांनी समजावून घेतले पाहिजे. भाषाशास्त्रांतर्गत ध्वनिशास्त्रात, व्याकरणात आणि साहित्यशास्त्रात, मीमांसा–वेदान्त आणि सांख्ययोगादि दर्शनांत,

ज्योतिषशास्त्रात आणि गणितात, रसायन आणि वृक्षायुर्वेदात भारतीय विचारवंतांनी कोणती भर घातली हे आधुनिक भारतीयांना माहीत असले पाहिजे. आधुनिक विज्ञानाशी कदाचित् हे ज्ञान मिळते--जुळते नसेल. पण तरीही त्याचा परिचय होण्याने भारतीय इतिहासाबद्दलचे अज्ञान दूर होईल. पृथ्वी स्वतःभोवती व सूर्याभोवती फिरते आणि त्यामुळेच ग्रहणे होतात, हे आर्यभट्टाला माहीत होते, एवढे समजताच राहू-केतूच्या भाकडकथांशी भारतीय ज्ञानाचा मेळ घालणारा आजचा तरुण जरा अधिक विचार करू लागेल. नेमके हेच संस्कृत-शिक्षणाचे उद्दिष्ट असले पाहिजे.

या उद्देशाने संस्कृत भाषा आणि वाङ्मय शिकवायचे असेल तर त्याचा ढाचा पूर्णपणे बदलावा लागेल. शालेय स्तरावर संस्कृत अनिवार्य करण्याने हे साध्य होणार नाही. त्रिभाषा-सूत्रात संस्कृत बसत नाही हे योग्यच आहे. कारण इतर भाषा जशा बोलण्यासाठी किंवा लेखन करता यावे म्हणून शिकविल्या जातात तशी संस्कृत शिकविली जाऊच नये. संस्कृत फक्त वाचून समजेल इतपत शिकविली जावी. म्हणजेच भाषांतर-निबंध-लेखन यांना अजिबात फाटा द्यावा; व्याकरण थोडेसे शिकवावे आणि मुख्य भर आकलनावर ( Comprehension ) असावा. पञ्चतन्त्रातल्या साध्या गोष्टी, गमतीदार सुभाषिते आणि सोपे गद्य-पद्य उतारे एवढाच संस्कृतचा अभ्यास शालेय स्तरावर व्हावा. पण त्याबरोबर संस्कृतमध्ये कोणकोणत्या ज्ञानशाखेत कोणकोणते वाङ्मय उपलब्ध आहे, महत्त्वाचे लेखक कोण, त्यांचे मोठेपण कशात आहे ही माहिती शिक्षणाचे माध्यम असलेल्या भाषेतून देण्यात यावी. म्हणजे संस्कृतच्या ज्ञानभांडारासंबंधी कुतूहल जागृत होईल. हे अर्थात् ऐच्छिक असावे. पुढे महाविद्यालयीन स्तरावर विद्यार्थी ज्या ज्ञान-शाखेकडे वळणार असेल त्या शाखेला अनुरूप असे संस्कृतचे ज्ञान त्याला देण्यात यावे. म्हणजे वाङ्मयाच्या विद्यार्थ्याला नाटके, काव्ये, साहित्यशास्त्राचे सिद्धान्त शिकविणे आणि तत्त्वज्ञानाच्या विद्यार्थ्यालाच शांकरभाष्य किंवा तर्कसंग्रह शिकविणे उचित ठरेल. अर्थशास्त्र-राज्यशास्त्र शिकणाऱ्यांना कौटिल्याचे विचार सांगणे आणि रसायनाच्या अभ्यासकांना रसायनाचा परिचय करून देणे योग्य होईल. पायथागोरस, अपोलोनियस, आर्किमिडिज् यांचा परिचय करून घेणारांना आर्यभट्ट, कणाद, भास्कराचार्य यांचा परिचय करून देण्यास काय हरकत आहे ? प्रश्न एवढाच आहे की, हे संस्कृतच्या प्राध्यापकांना करता येणार नाही. गणिताच्या प्राध्यापकांनीच ऑयलर आणि ला ग्रांज यांचे संशोधन भास्कराचार्यांना किंवा त्यापूर्वी इथे कसे माहीत होते हे समजावून घेऊन शिकवावे लागेल. मेडिकल कॉलेजच्या प्राध्यापकांनाच चरक-सुश्रुतांची महती सांगता येईल. यासाठी साऱ्या शिक्षणपद्धतीतच एक भारतीयत्वाकडील कल, संस्कृतविषयी आस्था जागृत करावी लागेल. ते जेव्हा होईल तेव्हाच संस्कृत भाषा आणि वाङ्मय शिकविण्याचा खरा उद्देश सफल झाला असे म्हणता येईल.

**भिठीबाई महाविद्यालय, विले पारले पश्चिम, मुंबई ४०००५६**

# आपण ह्यांना ओळखलंत का ?

माधव ना. आचार्य

प्रयोगासंबंधीच्या मागील टिपणाचा ( **भाषा आणि जीवन**, ३:१, पृ. १३ ) शेवट करताना म्हटले होते, " प्रयोगप्रकरण विद्यार्थ्यांना समजले आहे की नाही, हे पाहण्यासाठी, ' प्रयोग ओळखा ', एवढा प्रश्न पुरेसा आहे. "

पण ह्या बाबतीतही सारा मामला सरळ सोपा आहे, असे नाही. कर्ता, कर्म ह्या संकल्पना, क्रियापदरूप व प्रयोगांची नावे ह्यांविषयी इतकी उलटसुलट चर्चा मराठी व्याकरणकारांनी केली आहे की, ' नैको मुनिर्यस्य वचः प्रमाणम् ' ही उक्ती आठवावी. त्यामुळे प्रयोगप्रकरण शिकविणारे अध्यापक व शिकणारे विद्यार्थी हे श्राद्ध ' चटा 'वरच उरकून टाकीत असतात.

म्हणूनच या संदर्भातले काही धोके व ते टाळण्याची दिशा यांविषयी काही वेगळा विचार करता येतो का हे प्रस्तुत टिपणात अजमावयाचे आहे. अर्थात येथे पूर्वसूरींनी केलेल्या चर्चेतून सूचित झालेल्या दिशेने आपण जाणार आहोत. आजच्या काही व्याकरणकारांचा आधारही आपण घेणार आहोत.

## ( १ ) शकुंतलेला पत्र लिहावे लागले

( अर्थात दुष्यन्तास )

रूढ व्याकरण सांगते, ' लिहावे लागले '– संयुक्त क्रियापद.
कर्ता- शकुंतला (पर्यायहीन चतुर्थ्यन्त) कर्म–पत्र.
कर्म प्रथमेत, म्हणून **कर्मणी प्रयोग.**

येथे विवाद्य आहे ते क्रियापदरूप. त्यामध्ये दोन धातू आहेत– लिह– वा कृदन्त, लाग– लाख्याती रूप अशी रचना दिसते. जे आख्यातप्रत्यययुक्त ते क्रियापद. ' लिहावे ' हे कृदन्तरूप. त्या पदाचा ' लागले ' या पदाशी संयोग करणे हे व्याकरणशास्त्राच्या कक्षेत येत नाही. ' शकुंतला ' हा कर्ता ' लिहावे 'मधील ' लिह ' धातूचा आहे, हे मान्य, परंतु त्याला येथे महत्त्व नाही. येथे महत्त्व आहे ते आख्यातप्रत्यययुक्त धातूच्या कर्त्याला. तदनुसार ' पत्र ' हा शब्द येथे कर्तृस्थानी आहे. तो प्रथमा विभक्तीत,अतएव हा **कर्तरी प्रयोग** आहे.

जाता जाता हे लक्षात घेतलेले बरे की चतुर्थ्यन्त शब्दाचा क्रियापदावरील अधिकार संपतो.

**( २ ) कारणाशिवाय साखळी ओढणाऱ्यांवर रेल्वेकडून खटला भरला जाईल.**

रूढ व्याकरण ह्याला **कर्मकर्तरी** किंवा **नवीन कर्मणी** प्रयोग म्हणते. येथेही फसवणूक आहे ती ' भरला जाईल ' हे संयुक्त क्रियापद मानल्यामुळे. ' रेल्वे खटला भरील ' असे सरळ वाक्य असते तर वाद निर्माण झाला नसता. परंतु इंग्रजी वाक्यानुकरणाने उपरोक्त रचना रूढ झाली आहे. तिचा विचार करावा लागतो. येथेही रूढ व्याकरण कृदन्तकर्ता व आख्यातरूपकर्ता यांमध्ये विवेक करीत नाही. प्रत्यय लागून पद बनले की त्याचा अवतार पूर्ण झाला. त्याचा दुसऱ्या पदाशी केवळ अन्वय पाहणे एवढेच व्याकरणाचे काम; संयोग लादणे हे नव्हे. म्हणूनच येथे ' जाईल ' या क्रियापदाचा कर्ता ' खटला ' हा शब्द आहे व तो प्रथमेत आहे म्हणून हा **कर्तरी प्रयोग** सांगावा लागेल. ' रेल्वे-कडून ' या अनुयोगी अव्ययान्त शब्दाचा क्रियापदावरील अधिकार संपला.

**( ३ ) शकुंतलेचे पत्र लिहून झाले.**

रूढ व्याकरण याला ( समापन ) **कर्मणी प्रयोग** मानते. येथेही संयुक्त क्रियापदामुळेच घोटाळा आहे. ' शकुंतलेचे ' हा षष्ठ्यन्त शब्द कर्ता मानला जातो. तो कर्ता आहेही पण ' लिहून ' या कृदंतामधील धातूचा. एरव्ही चतुर्थ्यन्ताप्रमाणेच षष्ठ्यन्त शब्दाचाही क्रियापदावरील अधिकार संपुष्टात येतो. म्हणून प्रयोग ओळखताना आपल्याला फक्त क्रियापदाचा कर्ता हवा. तदनुसार ' झाले ' या क्रियापदाचा ' पत्र ' हा कर्ता येईल व तो प्रथमेत असल्यामुळे हा **कर्तरी प्रयोग** सांगावा लागेल.

**(४) अहो ! मला वाचता येतं !**

येथेही रूढ व्याकरण ' वाचता येतं ' (येते) या दोन पदांचा संयोग करून ' मला ' या चतुर्थ्यन्त शब्दाला कर्ता मानते व **भावे प्रयोग** सांगते.

येथे भावे प्रयोग आहेच. परंतु त्याचे कारण वेगळे आहे. ' येते ' या नपुं. तृ. पु. ए. वचनी क्रियापदाचा कर्ता ' वाचता ' हे कृदन्त अव्यय आहे. ते लिंगवचनोपाधि-रहित असल्यामुळे हा भावे प्रयोग आहे.

कृदन्त अव्यय हे कर्ता असते तसे कर्मही असते. उदा. ' बाळ बोलू लागला. ' येथे ' बोलू ' हे कृदंत कर्मपदी आहे. म्हणजे लिंगवचनोपाधिरहित शब्दही मराठी वाक्यात कर्तृपदी वा कर्मपदी येऊ शकतो.

आता थोड्या वेगळया प्रकारच्या क्रियापदांचा विचार करू.

**(५) मला काम करवते.**

' करव ' या शक्य धातूच्या उपयोगामुळे रूढ व्याकरण येथे **शक्य कर्मणी प्रयोग** सांगते.

येथे गफलत आहे ती मूळ धातू व धातुसाधित धातू यांमधील विवेकाची. ' करव ' या धातुरूपाचा विचार न करता येथे मूळ ' कर ' हा धातू मानून त्यावरून कर्ता लक्षात घेतला आहे. तो ' मी ' येतो. त्याचे ' मला ' हे चतुर्थ्यन्त रूप कर्तृस्थानी मानून ' काम ' या शब्दाला कर्म मानून त्याची प्रथमा विभक्ती असल्यामुळे हा कर्मणी प्रयोग सांगण्यात येतो. शिवाय व्युत्पत्तिदृष्ट्या शक्य क्रियापदे कर्मणी अर्थ व्यक्त करणारी मानली जातात.

व्याकरणातील शब्दघटना हा विभाग भाषेतल्या भाषेतील साधित शब्दांचा विचार करतो. या मर्यादित अर्थाने व्याकरणात व्युत्पत्तिविचार येतो. परंतु विकरणाच्या वेळी मूळ शब्द व साधित शब्द यांचा स्वतंत्रपणे विचार केला जातो. जसे– ' माणूस ' हे नाम व त्यावरून बनलेला ' माणसाळ ' हा धातू यांची विकरणव्यवस्था वेगवेगळी आहे. याच न्यायाने मूळ धातू व साधित धातू यांमध्ये जातिभिन्नता नसली तरी त्यांची वेगळी अंगे लक्षात घेऊन विकरण साधले जाते. तेव्हा ' कर ' हा धातू वेगळा; ' करव ' हा धातुज धातू वेगळा. अन्य पदांशी त्यांचा येणारा संबंध शोधतानाही त्यांची ही वेगळीक लक्षात घेतली पाहिजे. ' करव 'ची आख्यातरूपे व कृदन्तरूपेही ' कर ' पेक्षा वेगळी होतात. ही रूपे बनताना त्यांचे अंग ' करव ' असे राहते, ' कर ' नव्हे.

' मग शक्य ' करव ' व प्रयोजक ' करव ' यामध्ये फरक कोणता ? या दोहोंचा वाक्यातील अन्य शब्दांशी येणारा संबंध वेगवेगळा असतो. म्हणूनच प्रयोजक ' करव ' ची तिन्ही पुरुषी रूपे तर शक्य ' करव 'ची फक्त तृतीय पुरुषीच रूपे मिळतात. मात्र प्रयोजक ' करव ' सकर्मक असून शक्य ' करव ' अकर्मक आहे. रूढ व्याकरण व्युत्पत्ति-दृष्ट्या शक्य ' करव 'ला सकर्मक मानते. परंतु एखाद्या भाषेच्या पूर्वीच्या अवस्थेत एखादे रूप कसे होते यावरून विद्यमान भाषेचे व्याकरण ठरत नसते. त्यासाठी भाषेचा चालू व्यवहार पहावा लागतो. निष्कर्ष इतकाच की, प्रस्तुत वाक्यामध्ये ' करवते ' या शक्य क्रियापदाचा कर्ता ' काम ' हाच शब्द आहे. तो प्रथमेत असल्यामुळे हा **कर्तरी प्रयोग** आहे. मूळ धातू अकर्मक असेल तर त्याचे शक्यरूपी अंग अकर्तृक बनते. ' मला चालवते ' यासारख्या वाक्यांचा **अकर्तृक भावे** प्रयोग होतो. शक्य क्रियापदांची ही रूढिभिन्न व्यवस्था व्याकरणशास्त्राशी सुसंगत ठरेल.

## (६) आपण ह्यांना पाहिलंत का ?

हे वाक्य काही व्याकरणकारांच्या मते, ' आपण ह्यांना पाहिले का ? ' असे हवे. येथे ' आपण ' हा कर्ता तृतीयान्त असून ' ह्यांना ' हे चतुर्थ्यन्त कर्म आहे. कर्ता व कर्म कुणीच प्रथमेत नसल्यामुळे प्रयोग भावे. परंतु क्रियापदरूप नपुं. तृ. पु. ए. वचनी हवे. म्हणून ' पाहिले ' असा क्रियापदरूपबदल आवश्यक.

परंतु ' स्थितस्य गतिश्चिन्तनीया ' या न्यायाने ' पाहिलंत ' हेच रूप गृहीत धरून व्याकरण सांगणे भाग आहे. येथील ' त ', ' आपण ' या द्वितीय पुरुषी अनेक वचनी

कर्त्याच्या अपेक्षेने आला आहे. म्हणून याला कर्तृभावसंकर म्हणणे भाग आहे.

येथवर जी वाक्ये लक्षात घेतली त्यावरून मराठी प्रयोगव्यवस्थेतील जाणवलेले विशेष असे—

( क ) वाक्यातील आख्यातप्रत्यययुक्त धातुरूप म्हणजे क्रियापद. कृदन्त हा क्रियापदाचा घटक नव्हे.

(ख) मूळ धातू व साधित धातू यांमध्ये विवेक केला पाहिजे.

( ग ) कर्तृपदी वा कर्मपदी लिंगवचनोपाधियुक्त नाम-सर्वनामच येईल असे नाही. अव्ययही येऊ शकेल. क्वचित कर्ता क्रियापदान्तर्गतही असेल.

( घ ) ला / चा प्रत्यय किंवा अनुयोगी अव्यय लावल्यामुळे प्रातिपदिकाचा क्रियापदावरील अधिकार संपतो.

(च) भाषेतील रूढ रूपांचा विचार व्याकरणाने करावयाचा असल्यामुळे संकरात्म प्रयोग मानले पाहिजेत.

—तात्पर्य, भाषा स्वैरपणे रूपे धारण करीत राहणार व व्याकरणाला विचारीत राहणार– ‘ आपण ह्यांना ओळखलंत का ?’

**मु. पो. चौल, जि. रायगड ४०२२०३**

## वाणी आणि जाणीव

> यद्वै वाङ् नाभविष्यन्न धर्मो नाधर्मो व्यज्ञापयिष्यन्न
> सत्यं नानृतं न साधु नासाधु न हृदयज्ञो नाहृदयज्ञः ।
> वागेवैतत्सर्वं विज्ञापयति वाचमुपास्स्वेति ।

[ जिथे वाणी उपलब्ध नाही तिथे ना अधर्म जाणता येतो,
ना सत्य ना असत्य, ना चांगले ना वाईट, ना मनोज्ञ ना अमनोज्ञ,
वाणीच हे सर्व माहीत करून देते. वाणीची उपासना कर. ]

**छांदोग्योपनिषद् ७:२:१**

# चम्पा काळी काळी अक्षरं ओळखत नाही

त्रिलोचन

चम्पा काळी काळी अक्षरं ओळखत नाही
जेव्हा मी वाचायला लागतो, ती येते
उभी उभी ती गप्प ऐकत रहाते
तिला फार आश्चर्य वाटतं :
या काळ्या खुणांतून कसे हे सगळे स्वर
निघत असतात !

चम्पा आहे सुन्दरची पोरगी
सुन्दर आहे गवळी : गाई-म्हशी सांभाळतो तो
चम्पा तर ढोरांना घेऊन
चारायला जाते.

चम्पा चांगली आहे
चंचल खोडकरही आहे
कधी कधी मस्करी माजवते
कधी ती लेखणी चोरून नेते,
कशीबशी धुंडून लेखणी जेव्हा येतो मी
आढळतात काही कागद गहाळ
पुन्हा मी त्रस्त होतो.

चम्पा म्हणते :
तुम्ही कागदच गोंदत असता दिवसभर
हे काम फारच चांगलं आहे का !
ऐकून हे, मी हसू लागतो
लगेच चम्पा होत असते गप्प.
त्या दिवशी चम्पा आली, मी म्हटलं-
चम्पा, तूसुद्धा तर शिकावंस
अडचणीच्या वेळी उपयोगी पडेल ते

गांधी बाबांची ही इच्छा आहे :
सर्वजणांनी लिहावं आणि शिकावं.
—मी तर शिकणार नाही !

मी म्हटलं : चम्पा, शिकणं छान असतं
तुझं लग्न होईल, सासरी जाशील
काही दिवस बरोबर राहून जाईल तुझा नवरा कलकत्त्याला
फार फारच दूर आहे कलकत्ता,
कसा त्याला निरोप पाठवशील
कशी ग त्याची पत्र वाचशील ?
चम्पा, शिकणं छान असतं.

चम्पा म्हणाली : कसे आहा लबाड तुम्ही, पाहिलं,
रामा रे, तुम्ही शिकलेले असूनही इतके लबाड !
मी तर लग्न कधीच करणार नाही
जर लग्न झालं
तर मी आपल्या नवऱ्याला जवळच ठेवीन
कलकत्त्याला जाऊ देणारच नाही
कलकत्त्यावर वीज पडो !

**मूळ हिंदी वरून मराठी अनुवाद : श्यामविमल**

**कवीचा पत्ता : त्रिलोचन शास्त्री, अध्यक्ष, मुक्तिबोध पीठ, सागर विश्वविद्यालय, सागर ४७० ००३**

**अनुवादकाचा पत्ता : १ बी/२२ लाजपतनगर, नयी दिल्ली ११० ०२४**

## पूर्वग्रहदोष

—काय रे हे पुस्तक तू वाचलं आहेस का ?
—वाचलं म्हणून काय म्हणतोस ? मी तर त्याचं परीक्षण लिहिलं आहे.
—म्हणजे, परीक्षण करायचं पुस्तक तू चक्क वाचतोस ?
—हो बुवा, साधारणतः वाचतो ना. का ? चुकलं काही ?
—चुकलं म्हणजे चांगलंच चुकलं ! पुस्तक वाचून तू परीक्षण लिहिणार, म्हणजे ते पूर्वग्रहदूषित नाही का होणार ?

**ॲडम्ज, द ट्रेझरी ऑव्ह मॉडर्न ॲनेक्डोट्स, १९८१**

# ‘ वछाहरणा ’तील अर्थप्रपंच

**व. दा. कुलकर्णी**

दामोदर पंडित हे महानुभाव पंथ संस्थापक श्री सर्वज्ञ चक्रधराचे निःसीम भक्त आणि उपासक होत. पंथीय ‘ साती ग्रंथात ’ त्यांच्या ‘ वछाहरण ’ या काव्यग्रंथाला मानाचे स्थान प्राप्त झाले आहे. या ग्रंथाशिवाय हिन्दी-मराठी भाषामिश्रित साठ चौपद्या, वियोगधुवा, आरत्या इत्यादी त्यांची रचना आहे. पंथात या चौपद्या ‘ परमप्रमाण स्मृतिरूप ’ म्हणून मान्यता पावल्या आहेत. ‘ गायनाचार्य ’ या उपाधीने पंथात दामोदर पंडिताचा गौरव केला गेला आहे. पंडिताचे मित्र केसवदेय संस्कृत पंडित होते. आद्य आचार्य नागदेवाचार्य यांनी ‘ केसवदेयासि संस्कृत सरळीः आणि पंडितबासी संस्कृती मन्हाटिया सरळी ’ असे त्यांना प्रशस्तीपत्र बहाल केले. शिवाय, ‘ माझे शास्त्र म्हाइंभटा लक्ष्मीन्द्रभटाचेनि नुजळेचि; ते पंडित केसवदेयासि चर्चा करिता उजळे ’ असे नागदेवाचार्य म्हणत असत. मराठीतील सर्वात प्राचीन कालोल्लेखित हस्तलिखित प्रत शके १४५७, ‘ वछाहरणा ’ची आहे. या काव्याच्या सकळलिपीतही प्रती आढळतात. या काव्यग्रंथाची रचना शके १२०७ ते १२११ या कालखंडात झालेली आहे. पवित्र धर्मग्रंथाप्रमाणे या ग्रंथाची जपवणूक पंथीयांनी केली आहे. तेव्हा मराठीची प्राचीन शब्दरूपे, किमान शके १४५७ ची या ग्रंथातून अभ्यासकांना उपलब्ध होतात. म्हणूनच अर्थविन्यासाच्या अभ्यासासाठी हा ग्रंथ उपयुक्त ठरावा. प्राचीन काव्यातील भाषेचे सौंदर्य- हे कवीच्या आलंकारिक भाषायोजनेवर अवलंबून असे. काव्यमय भाषा म्हणजे उत्तुंग कल्पनाविलास समजला जाई. कवितेतील भाषासौंदर्य संस्कृत काव्यशास्त्राच्या सिद्धान्तानुसार जोखले जाई. अर्थविन्यासाच्या दृष्टिकोनातून पंडितांनी आपल्या काव्यातून जी समर्पक योजना केली आहे व त्यातून अर्थसौंदर्य कसे अभिव्यक्त झाले आहे, हे जाणून घेण्याचा हा एक प्रयत्न आहे.

## संकल्पना स्त्री

स्त्री या शब्दरूपाबरोबर पंडितांनी वनिता, आंतौर, अंगना, पण्यांगना, प्रमदा, नारि, कामिनी, अर्धांग, बाईल अशी शब्दरूपे योजिली आहेत.

१. वनिता– ( ३२, २८४ ) जिला मागणी घातली जाते ती स्त्री वनिता. देवांच्या संदर्भात त्यांचा उल्लेख आहे.

२. आंतौर– ( ५९ ) अंतःपुरातील स्त्री. श्रीकृष्णाचे गुणवर्णन करताना ही ओवी आली आहे. श्रीकृष्णाने भौमासुराच्या अंतःपुरातील सोळा सहस्र स्त्रियांची मुक्तता करून त्यांना आश्रय दिला. या कथेला अनुलक्षून

' आंतौरे ' हे औचित्यपूर्ण शब्दरूप योजिले आहे.

३. प्रमदा– (२३४) आलिंगन देणारी. श्रीकृष्णाच्या गळयातील वैजयंतीमाला हीच त्याला आलिंगन देणारी प्रमदा आहे, असा शब्दप्रयोग आहे.

४. कामिनी– (१५४) कामासक्त स्त्रीने प्रियकराला उद्युक्त करावे या अर्थी. कल्पलतेने मंदारवृक्षाला आलिंगन देऊन उद्युक्त केले.

५. अर्धांग– (१७८) यमुनातटी सोमकांताचे घाट आहेत, मुक्तिगर्भ संपुष्टे आहेत, हिरेलग वाळवंट आहे आणि त्यात भर म्हणजे विविध अलंकारांनी नटलेल्या श्रीकृष्णाचे प्रतिबिंब यमुनाजळात पडले आहे. यमुना ही रत्नाकराची अर्धांगी असल्यामुळेच की काय तिने हे रत्नजडित अलंकार लेइले आहेत असा औचित्यपूर्ण अर्थ ' अर्धांगी ' या शब्दातून प्रतीत होतो.

## संकल्पना साप

सर्प, भुजंग, शेष, फणिक, सहस्रवदन, नाग, काळ, विरोली ही समानार्थी शब्द-योजना असली तरी अर्थाचे सौंदर्य वाढविण्याच्या दृष्टीने त्यांचा योग्य ठिकाणी उपयोग केला गेला आहे.

१. फणिक (१८६)

हतिरुएं सिंहेसि खेळत : मृग व्याघ्रासि करुबाळा करित
मोराचा पाखळा विसंवत : फणिक देखा ।।

मोराच्या फुललेल्या पिसाऱ्याच्या छायेत आपल्या उभारलेल्या फण्यासहित फणिक विसावतो. फुललेला व उभारलेला फणा या साधर्म्याने अर्थाचे सौंदर्य वाढते. शिवाय, हत्ती-सिंह, मृग–व्याघ्र; मोर–फणिक यांचे असलेले परस्पर शत्रुत्व लोप पावून हे परस्पर विरोधी गट एकत्र नांदतात, नव्हे क्रीडा करतात ही श्रीकृष्ण–महिम्याची चमत्कृती येथे दर्शविल्यामुळे भाषेचे सौंदर्य खुलले आहे.

२. सहस्रवदन (३२५, ४२०) आपल्या सहस्रवदनाने शेष श्रीकृष्णाची स्तुती करतो तरीही ती तोकडीच पडते हे सांगण्यासाठी ही शब्दयोजना.

३. विरोली (३८९) ब्रह्मदेवाने श्रीकृष्णाची स्तुती केली. एखाद्या विरोलियाने सहस्र-वदन शेषाची बरोबरी करण्यास धजावे असे ब्रह्मदेवास वाटते. विरोली व सहस्रवदन शेष यातील विरोधाभासामुळे ब्रह्मदेवाच्या टिकाणी अमानित्व असल्याची अर्थच्छटा येथे प्रत्ययास येते. तसेच श्रीकृष्ण हा सार्वभौम राजा. तो सहस्रवदन. अनेक चार त्याच्या पदरी.

## ध्वनिसाम्य पण अर्थभिन्नता

शब्दरूपांमध्ये ध्वनिरूप साम्य असले तरी ध्वनिविन्यासाबरोबरच भिन्न अर्थाचे निर्देशन होते.

### जाति

१. तेथे वनपुष्प जाति ( १५८ ), येथे समुदाय या अर्थी.
२. जाति केतकी दले ( २४४ ), जाईच्या पुष्पास अनुसरून.
३. पर्वतबुधि साउमे जाति ( ९९ ), यात जाणे क्रियापदाचे वर्तमानकालीन रूप आहे.
४. गोकुळा जाति जालि वेळ ( २७० ), परत जाण्याची वेळ. या अर्थी विशेषणासारखा उपयोग केला आहे.

### गुण

' गुण ' हे शब्दरूप द्विअर्थी नाही तर प्रत्येक ठिकाणी ते स्वतंत्र पद आहे.
' स्मरता ' ईश्वराचे गुण ( ७ ) यात सद्‌गुण, कृपादी गुणाला अनुलक्षून अर्थ आहे.

जो चंद्रु चकोराचें जिवन : अमृतें निववी त्रीभुवन
तोहि गुणें एकें निरांजन : मानि कलावतु ।। (२३)

चकोर हा चंद्रकिरणे सेवन करतो या कवि संकेताबरोबरच सोळा कळांनी युक्त असलेल्या निरांजनातील एका वातीने जरी ओवाळले तरी तो संतुष्ट होतो किंवा संतांच्या एका गुणामुळेही ईश्वर संतुष्ट होतो. येथे गुण हा श्लिष्टार्थी योजिल्यामुळे अर्थसौंदर्यात भर पडली आहे.

तेजाचां गुणिं विणिला : पन्हरेयाचेनि रंगे रंगला
तो पितांबरु असा वेढिला : मालगंटि ।। (२२४)

श्रीकृष्णांचा पितांबर हा प्रकाशाच्या तंतूंनी विणला असून सोन्याच्या रंगाने रंगविलेला आहे. तेजाच्या किरणांवर तंतूंचे केलेले रूपक काव्यात्म आहे.

### परगुण

ते तोकडेयाहि परगुणा संत : संतोखति ( २४ )

यात परगुणा ह्या शब्दरूपात पदभेदामुळे पर + गुण म्हणजे इतरांचे गुण हा अर्थ निश्चित होतो. परंतु—

घरोघरीं परगुणें : होतसे मर्दना मादनें
दिव्यें लाविताति चंदने : सुगंधा पुष्प जाति ।। (३०८)

यात परगुणे हे शब्दरूप द्विअर्थी नाही तसेच अनेकार्थीही नाही. परंतु पदभेदामुळे व एकात्म पदामुळे अर्थाची निश्चिती करणे कठीण जाते.

पर + गुण : ईश्वराचे गुण
पर + गुण : इतरांचे गुण

परगुण : सुगंधी द्रव्ये, चांपेल, मोगरेल, उटणे
परगुण : पारणे, मेजवानी

**चालति**

१. राजहंसाची गति चालति ( ८७ )
२. तुझे पवाडे जेथ चालति ( ४४० )

यात चालति या क्रियावाचक शब्दरूपात ध्वनिसाम्य असून अर्थच्छटा मात्र भिन्न आहेत.

**निर्मल**

कालिंदी जल निर्मल : श्रीकृष्णकांति श्यामल
प्रतिबिंबली म्हणौनि सुनील : होउनि गेली ॥ ( १६८ )

श्यामलकांती श्रीकृष्णाचे प्रतिबिंब निर्मल कालिंदी जलात पडल्यामुळे ती सुनील झाली, श्रीकृष्णरूपात भिनली. कल्पनासौंदर्यामुळे आशयाच्या अर्थाला घनता प्राप्त झाली आहे.

श्रीकृष्णरूप हृदइं प्रवेसलें : तंव आद्यासुरपण गेले
आत्मस्वरूप निर्मल जाले : तेणें सन्येधानें ॥ ( ११४ )

पंथीय तत्त्वज्ञानानुसार शब्दरूपावर पारिभाषिक अर्थ अधिष्ठित होतो. यात ' निर्मल ' यावर मलरहित अर्थाबरोबरच पंथीय तत्त्वज्ञानपर अर्थ आरोपित केला गेला आहे. आदिमळ, कारणमळ, कार्यमळ, अंतःकरणमळ, इंद्रियमळ, तत्त्वमळ, देहमळ, धातुमळ, प्रकृतिमळ, भूतमळ, विकृतिमळ, विकृतिविकृतिमळ, विदेहमळ, विषयमळ, असे पंधरा मळ जीवाला लागलेले असतात असे महानुभाव तत्त्वज्ञान सांगते. परमेश्वर एक एक मळ फेडून जीवाला निर्मलरूप देतो ही तत्त्वज्ञानपर संकल्पना माहीत असल्याशिवाय त्यातील अर्थसौंदर्य अनुभवता येणार नाही. माया, शांभव, कर्मफळ, प्रपंच अशा अनेक महानुभाव तत्त्वज्ञानपर पारिभाषिक संज्ञा ' वछाहरणात ' उपयोजिल्या आहेत.

**साहचर्यपर अर्थ : ब्राह्मणू**

यमलोकीं धाडि घालौनि : अर्जुनेसीं क्षीराब्धी जाउनी
मृत्यें अपत्यें आणुनि : ब्राह्मणु संतोखविला ॥ ( ११० )

यात ' ब्राह्मणु ' हे शब्दरूप संदिपनीच्या संदर्भातच मर्यादित आहे. सामान्यार्थाने वापरता येणारे शब्दरूप इतर शब्दरूपाच्या सान्निध्याने त्या स्थलापुरतीच अर्थनिश्चिती करीत असते.

ध्वनिरूपात साम्यता, एकत्र व्युत्पत्ती परंतु प्रयोगामुळे अर्थामध्ये भिन्नता आढळून येते.

## जलचरे

१. धन्य तेथिची जलचरे ( १८८ ) यात जलातील जीव, प्राणी, मासे इत्यादी केवळ वाच्यार्थच प्रत्ययास येतो.

२. क्षूद्र देवता जलचरे ( ३६५ ) यात पात्र जलामध्ये राहणाऱ्या देवतांचे निर्देशन आहे. महानुभाव तत्त्वज्ञानानुसार एक्यांशी कोटी सव्वा लाख दहा देवता आहेत. त्यात कर्मभूमीच्या नऊ थोव्यापैकी शेवटच्या थोव्यात तेरा कोटी देवता असा येथे अर्थ घ्यावा लागतो.

## शैलीगत अर्थ

समुदायाचे निर्देशन करण्यासाठी 'वछाहरणात' जन, झाका, गण, थोवा, दल, वृंद, बैकार, जाति, ग्राम, घोष, आरौ, घोल, उल, कुल, थि, आलि, आवलि, संग, परिपारु, पुंजु, मंडळ अशी अनेक शब्दरूपे आली आहेत. भक्त वा मुनि यांचा 'जन'; भ्रमर, पतंग, राजहंस, यांचा 'झाका'; तारांचा 'गण'; द्विजांचा 'वृंद'; वृक्षांचा 'आरौ'; पुष्पांच्या 'जाति'; जलाचा 'चि'; दैत्यांचा 'संग'; गाई-वासरांचा 'परिवारु'; तेजाचा 'पुंजू'; भू चे 'मंडळ' अशा योग्य शब्दांची निवड केल्यामुळे शैलीगत अर्थ सिद्ध झाला आहे.

श्रीकृष्णाला कान्हा, देवकीनंद, अच्युत, आदिनाथ, करुणाकर, कैवल्यपती, गोपवल्लभ, चक्रधर, जगजेठी, परम मंगलमूर्ति, परेश, भगवंत, मुकुंद, वनमाळी, सर्वेश्वर, सर्वज्ञ-नाथ, अशा जवळपास ७०/८० गुणविशेषांनी संबोधिले आहे. त्या त्या संदर्भात योग्य गुण विशेषनामाची निवड केल्यामुळे अर्थसिद्ध होतो व भाषेचे सौंदय वाढते.

सर्वसामान्याचे ते जेवण, श्रीकृष्णाचे सवंगडी व भक्त यांचे भोजन आणि श्रीकृष्णाचे ते आरोगण अशी शब्दरूपे कटाक्षाने योजिलेली आढळतात. रूढार्थाने हा अर्थसंकोच असला तरी नेमक्या शब्दयोजनेमुळे अर्थगौरव झाला आहे.

'वछाहरणा'त काही कानडी भाषेतील शब्दरूपे मराठी पेहराव लेऊन आली आहेत. 'ओलगणे' ( २०६ ). कानडीत ओलगिस्सु हा सेवा करणे या अर्थी येतो. मराठीत विशेषतः महानुभाव तत्त्वज्ञानाच्या संदर्भात नामरूपात 'ओलगण्या' हे शब्दरूप आले आहे. परमेश्वराची निरंतर सेवा करणाऱ्या देवता ह्या ओळगण्या होत. हे अर्थाचे परिवर्तन लक्षणीय आहे. 'आरोगणा' या शब्दरूपाबद्दलही असेच म्हणता येईल. कानडीत हे रूप 'ओरग्गु' असे आढळते. देशीनाममालेत 'आरोग्गिअं' असे रूप आहे. परमेश्वराचे भोजन ते आरोगणा असा मर्यादित अर्थ पंथीय पारिभाषिक संज्ञेने निश्चित केला आहे. 'उतातिया' ( १३५ ) याचे उच्चारण कानडीत भिन्न असेल. पण मराठीच्या स्वरूपात तो अनेकवचनी प्रत्यय लावून वेगळया रूपात आला

आहे. उत्तरकानडी प्रदेशातच या शब्दाचा व्यवहार आहे. 'करपताति' (४५०) हा शब्दही असाच. कानडीत 'करकु' हा होरपळणे या अर्थाचे निर्देशन करतो. मराठीत अर्थच्छटा भिन्न असून त्या आख्यात प्रत्ययाने त्याचे वेगळे रूप सिद्ध झाले आहे.

काव्यातील भाषासौंदर्य प्रतीत व्हावे या उद्देशाने हा एक 'प्रपंच' उभारला आहे.

**मराठी विभाग, उस्मानिया विद्यापीठ, हैदराबाद ५०००००७**

## खेळाची सांगता

रंगभूमीवरच्या प्रयोगाची परिणती दोन वेगळया प्रकारे होऊ शकते ह्याचा आपल्याला विसर पडला आहे. एक उत्कर्षबिंदू उत्सवी स्वरूपाचा असतो- तालात पाय आपटून, गजर करून, जयजयकार करून, टाळया वाजवून आपला सहभाग एकदम स्फोट पावतो. उलट दुसऱ्या टोकाला मूक स्वरूपाचा उत्कर्षबिंदू असतो- आपण एकत्र घेतलेल्या अनुभवाची ओळख पटते, त्यात घेतलेल्या रसाची पावती देतो ती स्तब्धतेच्या रूपाने. आपल्याला शांततेचा बहुत करून विसर पडला आहे. शांततेने आपण ओशाळतो, यांत्रिकपणे आपण टाळया वाजवतो कारण दुसरे काय करायचे ते आपल्याला माहीत नसते, कधी शांतताही चालू शकते, उचित असते ह्याची जाण आपल्याला नसते.

**पीटर ब्रुक, दि एम्टी स्पेस, लंडन १९६८** (ह्याने १९८५ साली फ्रान्समध्ये महाभारताचा नाट्यप्रयोग केला, तो अर्थात पाश्चात्त्य प्रेक्षकांबद्दल बोलत आहे. मराठी प्रेक्षक क्वचित मूक स्तब्धता पाळतात, कधीमधी आठवणीने टाळया वाजवतात; पण बहुतेक वेळा प्रेक्षागृहाबाहेर घरंगळत येतात- खेळ खलास!)

## कानी पडलेला संवाद

एका लहान मुलाला शिक्षकांनी धडा वर्गापुढे मोठ्याने वाचायला सांगितला. नंतर शिक्षक विचारतात, "आता काय वाचलंस त्याचा अर्थ सांग बरं." मुलगा दचकून म्हणतो, "काय कुणास ठाऊक! माझं ऐकताना लक्ष नव्हतं." आता दचकायची पाळी शिक्षकांच्यावर!

# मराठीला लाभलेला एक अनन्वय अलंकार

डॉ. भालचंद्र फडके यांचे **डॉ. बाबासाहेब आंबेडकर** हे पुस्तक श्रीविद्या प्रकाशन, पुणे यांनी १९८५ साली प्रकाशित केले. या पुस्तकाची ही केवळ 'भाषिक' समीक्षा आहे. अर्थात, पुस्तकातील आशय, त्याची युक्तायुक्तता, त्याचे वाङ्मयीन किंवा वैचारिक मूल्य, त्याची मांडणी, पुस्तकाचे बाह्य रूप, त्याची बांधणी, छपाई, त्याचे मूल्य वगैरे गोष्टींचा विचार येथे प्रस्तुत नाही. या समीक्षेत पुस्तकातील केवळ भाषेचा विचार केला जाणार आहे. पुस्तकाच्या भाषेत मुख्यतः लेखकाचा हात असतो; पण मुद्रक, मुद्रितशोधक, एकूण परिस्थिती वगैरे गोष्टीही भाषेचे स्वरूप ठरण्यास गौणतः कारणीभूत होतात. तेव्हा या समीक्षेचा मुख्य रोख लेखकावर असला, तरी मुद्रक, मुद्रितशोधक, परिस्थिती यावरही ती गौणता रोखलेली आहे, हे ध्यानात घ्यावयास हवे. किंबहुना, ही सर्वच समीक्षा लेखकावर, मुद्रकावर, मुद्रितशोधकावर किंवा कोणाही 'विशिष्ट' व्यक्तीवर रोखलेली नसून, पुस्तकातील भाषेस व्यक्तींचा जो 'समूह' जबाबदार आहे. तो 'समूह' हे या समीक्षेचे लक्ष्य आहे. समीक्षेमधील स्तुतिनिंदेचे वाटप त्या समूहातील व्यक्तींनी आपापल्या प्रत्यक्ष जबाबदारीप्रमाणे यथाप्रमाण करून घ्यावे. प्रस्तुत पुस्तक डॉ. बाबासाहेब आंबेडकरांविषयी असले तरी प्रस्तुत समीक्षेचा डॉ. बाबासाहेब आंबेडकरांशी यत्किंचितही संबंध नाही.

भाषिक समीक्षेत, गुणदोष सांगताना किंवा सरस-नीरस ठरवताना किंवा प्रतवारी लावताना काही मानदंड समीक्षकाला अभिप्रेत असला पाहिजे. 'प्रचलित प्रमाण मराठी', 'त्या प्रमाण मराठीचे प्रमाण लिखित रूप, महाराष्ट्र-साहित्य महामंडळाच्या शुद्ध लेखनानुसार ठरणारे त्या रूपाचे विशिष्ट रूप, हा मानदंड प्रस्तुत समीक्षेत अभिप्रेत आहे. 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर' हे पुस्तक प्रचलित प्रमाण मराठीतच लिहिलेले असल्याने आणि त्यात महाराष्ट्र-साहित्य-महामंडळाचेच शुद्धलेखन अनुसरले असल्याने त्याच्या समीक्षेत हा मानदंड वापरला तर त्यावर अन्याय होण्याची शक्यता खूपच कमी होते.

मराठीतील जोडाक्षरांचे लेखन काही संकेतानुसार होत असते. पण प्रस्तुत पुस्तकात अनेकदा हे संकेत लाथाडले आहेत. उदाहरणार्थ, प्रस्तुत पुस्तकातील पुढील लेखन पहा आणि चौकोनी कंसात दिलेले संकेतानुसारी लेखन पहा :

इन्सिटट्यूट [इन्स्टिट्यूट] (१५), चिल्डरन [चिल्ड्रन] (२१), अस्पश्यता [अस्पृश्यता] (२०). स्वातंत्र्य [स्वातंत्र्य] (२५), बुध्दिभ्रष्ट [बुद्धिभ्रष्ट](२६)

दृष्ट या [ दृष्टया ] (६७), जिहल्हयाच्या [ जिल्ह्याच्या ] (९२), मुददयांची [मुद्यांची] (२२५).

मराठीतील जोडाक्षरे सामान्यतः उच्चारानुसारी 'रचली' जातात. म्हणजे, जोडाक्षरातील अवयव उच्चारक्रमाने, डावीकडून उजवीकडे, किंवा वरून खाली, लिहिले जातात. 'त्र्यं' शब्दातील पहिल्या जोडाक्षरात अवयवांची रचना डावीकडून उजवीकडे आहे, तर दुसऱ्या जोडाक्षरात अवयवांची रचना वरून खाली आहे. पण जोडाक्षर-रचनेचा हा संकेत प्रस्तुत पुस्तकात बऱ्याच जोडाक्षरात सांभाळलेला असला, तरी अक्षरशः शंभर-सवाशे वेळा धाब्यावर बसविला आहे. विशेषतः 'द्ध' हे जोडाक्षर 'ध्द' असे लिहिले आहे. जेव्हा 'द्'चा उच्चार आधी आणि 'ध्'चा उच्चार नंतर होतो तेव्हा 'द्ध' किंवा 'द्‌ध' असेच लेखन व्हावयास हवे. पण ते 'ध्द' असे केले आहे. उदाहरणार्थ,

सिध्द, बौध्द, प्रबुध्द भारत, प्रसिध्द, बुध्दिभ्रष्ट, सिध्दान्त, सध्दर्म, विरुध्द, शुध्द, श्रध्दांजली, उध्दरासाठी, वृध्द, वाग्युध्द, प्रसिध्द, पध्दत, सुध्दा, अस्पृश्योध्दार.

जोडाक्षरांच्या सदोष लेखनात मुद्रितशोधनामधील दुर्लक्ष काही प्रमाणात अनुस्यूत असणारच. मुद्रितशोधनामधील दुर्लक्ष पुढीलसारख्या लेखनातही वारंवार दिसते.

'प्रभात्र' ['प्रवात' बद्दल] (२५) 'समाजाने बहिष्कृत केलेल्या माझ्यासारख्याला या थोर ग्रंथांनीच जवळ केले. ह्या ग्रंथांनीच मला जवळ केले.' (३२), 'काँग्रेसचा [च्या] ध्येयधोरणात' (६०); '... 'I hope to be reborn in some poor unknown peasant...' [शेवटी family सारखा शब्द गळलेला] (६३); 'मुंबई इलाक्यात' (१२५); 'शूद्रादिशूद्रांनी (शूद्रातिशूद्रांनी) (१३९); 'काँग्रेसपक्षाने या पहिल्या गोलमेज (१९३० परिषदेवरही बहिष्कार घातला.) [कंस पुरा केलेला नाही.] (१४३); 'य बैटकीत' (१४६); 'सद्सद्‌विवेकबुद्धी' (१५१); 'अद्यापि. चालू आहे;' (१६५); 'मर्दी' [माझी], (१७९); 'गोखले' [ओगले] (१८७); 'घोषनेमुळे (१९१); जातिप्रथाविरूद्ध (१९१); सिद्धांन्त (२८७); 'संधराज्य' (२००); 'म्हणले' (२०३); 'मात्रा' [मात्र] (२०३); 'दूर्दशा' (२३७ वगैरे); 'दुरूस्ती' (२८३); 'बंडकोरीची भाषा' (२८५); 'अज्ञानाअंधकार' (१८८); 'Verdiet an India नावाचा ग्रंथ' (२१२)

काही ठिकाणी प्रकरणाच्या शेवटी अंक घालून टिपा दिल्या आहेत, पण प्रकरणाच्या मजकुरात टिपांचे अंकच गळाले आहेत; तर काही ठिकाणी टिपांचे मजकुरातील अंक विद्यमान असून टिपाच गळाल्या आहेत. (प्र. २, ११, २१) गलथान मुद्रितशोधनाचाच तो परिणाम दिसतो. तीच गोष्ट अवतरणचिन्हाचा प्रथमार्ध वा द्वितीयार्ध लुप्त होण्यासंबंधी म्हणता येईल. (पृ. १५, ४८, ४९, ५७, १४६, १४९, १६५, २०१ २२६, २५३ वगैरे)

वर आक्षेपार्ह म्हणून ज्या लेखनाचा उल्लेख झाला आहे ते लेखन म. सा. महामंडळाच्या शुद्धलेखनाप्रमाणे अशुद्धच ठरते. या शुद्धलेखनाला मान्य न होणारे पुढील काही नमुने बघण्यासारखे आहेत.

' हिंदु माणसांची ' ( ११ ), ' शिळ्या, कढीस उत ' (२४), ' माहित ' ( ८५ ), ' लिहित ' ( १९ ), सर्व [= अनेक] वर्गांकडून ( १६२ ), कदाचित् (२२६), उर्जा (मनोगत ३), दास्यत्व [ दास्य पुरेसे नाही काय? " दास्यत्व हे दुहेरी भाववाचक नाम थोरामोठ्यांनीही काही वेळा वापरलेले आहे. ], मुक्तीसंग्राम (१६८), बुद्धीप्रामाण्यवादी (२४५), मनुवर ( २४७ ), वैयक्तीक ( १५७ ), सभामधून [ अनेक वचन ] (७४), ' प्रत्त्युत्तर ' [ प्रत्युत्तर ] (१०९) अनिर्णित (१६८), जोसेफ मॅझिनीनी [ मॅझिनीने किंवा मॅझिनींनी ] (१८४), ईश्वर प्रणित ( २८७ )

शब्द सामासिक असल्यास तो तोडून न लिहिता जोडून लिहावा, अशी जुनी परंपरा होती. अलिकडे सामासिक शब्दांतील अवयव ( इंग्रजीप्रमाणे ) तोडून लिहिण्याचा थोडा फार प्रघात पडत आहे. हा प्रघात योग्य की अयोग्य, याचा विचार भाषाकोविदांनी अवश्य करावा. प्रस्तुत पुस्तकात समास कधी जोडून तर कधी तोडून लिहिले आहेत. कधी एकाच सामासिक शब्दात काही अवयव जोडून तर काही अवयव तोडून लिहिले आहेत! सामासिक शब्द तोडून लिहिण्याची किंवा अर्धवट जोडून नि अर्धवट तोडून लिहिण्याची पद्धती मला स्वतःला स्वीकरणीय वाटत नाही. प्रस्तुत पुस्तकातील पुढील काही उदाहरणे चिन्त्य आहेत :

' प्रकाश किरण ' (मनोगत पृ. १ ), ' आंबेडकर विषयक ' (मनोगत, २)' विचार विषमता ' (३), ' सुवर्ण परिमाण चलन पद्धतीला ' (५), ' जाती तत्त्व ' ( ११ ), ' हिंदुसमाज पुनर्घटनेचे कार्य ' ( १८ ), ' पेशवाई छाप ' ( २२ ), ' भोजन भास्कर ' (२३), ' ब्रिटिशांच्या प्रलोभन नीतीला ' (१०२), ' अध्यक्ष नियुक्तीचे ' ( ११९ ) ' घटितशोधन समितीचा ' (१३२), ' धर्म शास्त्रांची कडक चिकित्सा ' (१३६), ' वेदप्रमाणमानणाऱ्या हिंदूंना ' (१४०), ' डॉ. आंबेडकर गांधीजी संघर्षाला ' (१६९), ' जीवन संघर्षाचे रूपांतर वर्गविग्रहात होऊ नये. ' (२२१), ' एक पत्नीव्रताचे बंधन ' (२३८), ' प्रतिक्रांती शक्तींनी. ' (२८५)

थोर लेखक जुन्या शब्दांना नवे अर्थ देऊ शकतात; किंवा अन्वर्थक नवे शब्दही बनवू शकतात. पण शब्दांचा प्रचलित अर्थ न बघता ते कोणीही कसेही वापरावेत, असा त्याचा अर्थ होऊ शकत नाही. तसे केल्यास ' अवाचकत्व ' नामक दोष पदरी येतो. प्रस्तुत पुस्तकात काही शब्द काही ठिकाणी भलत्याच अर्थाने वापरले आहेत. उदाहरणार्थ,

' माणुसकीला काळिमा लावणारी ही गुलामगिरी विसाव्या शतकात चालू आहे. म्हणून ती रद्द करून शेतकऱ्यांची पिळवणूक थांबवली पाहिजे असे आश्वासन चिप-

ळूणच्या शेतकरी परिषदेत आंबेडकरांनी दिले होते.' [असे **आवाहन**... आंबेडकरांनी केले होते.] (१२५)

'म. गांधीजींसारख्या मातब्बर सर्वमान्य नेत्याला **आवाहन** देऊन बाबासाहेबांनी... शर्थीची झुंज दिली...' [आव्हान]. (१५७)

'आत्मसन्मानास **मुकवून** [मुकून] कुठलाही समाज स्वतःचा उद्धार करू शकत नाही.' (९४)

मात्र, अवाचक शब्दांचा वापर प्रस्तुत पुस्तकांत जरी क्वचित आढळला तरी तो फार थोड्या ठिकाणी आढळतो, हे सांगावयास हवे.

विशिष्ट संदर्भात वाक्यामध्ये अध्याहृत पदे ठेवण्याची पद्धती मराठीत आहे. आणि तो 'विशिष्ट संदर्भ' संकेतांनी ठरलेला आहे. पण प्रस्तुत पुस्तकात संकेत गुंडाळून पदे अध्याहृत ठेवण्याची काही सवयच लेखकाला लागलेली दिसते. पदे अध्याहृत ठेवणे केव्हा योग्य, केव्हा अयोग्य, यासंबंधी मतभेद होऊ शकेल. पण अध्याहृत पदाची पुढील उदाहरणे चिन्त्य आहेत :

"याशिवाय त्यांनी हजारो ग्रंथांचे परिशीलन केले. त्यांचे संस्कार त्यांच्या विचारांवर झालेले आहेत. महात्मा जोतीराव फुले याचे चरित्र लिहायचे * योजले होते." [* त्यांनी] (२).

"अनेक ग्रंथांचे आराखडे ते तयार करीत. त्यातले सर्वच पूर्ण होत नसत. त्यातले * पूर्ण बदलत तर काही वेळा त्यातली काही प्रकरणे, काही भाग लिहून होई." [* काही]. (२१)

"असे केवळ म्हणूनच ते थांबले नाहीत तर त्यासाठी * शाळा सुरू केल्या." [* त्यांनी] (४२)

"हे फर्मान म्हणजे अस्पृश्यतेवर केलेला घणाघात होता. आपल्या खाजगी खर्चातून अस्पृश्यांसाठी * वसतिगृहे सुरू केली..." [* शाहू महाराजांनी] (४८)

"शाहूंच्या कार्याचा गौरव 'अस्पृश्योद्धारक' अशा शब्दात * करीत, तर कर्मठ लोक 'घेडांचा राजा शाहू महाराजा' अशी त्यांची अवहेलना करीत." [* ते / बाबासाहेब] (४९)

"त्यामुळे कित्येक वेळा या पत्रांशी बहिष्कृत भारताला झुंज द्यावी लागली. तर [= पण] पत्रकर्त्यांच्या स्वातंत्र्यावर जर सरकारने आक्रमण केले तर सरकारचा निषेध करण्यास * मागेपुढे पाहिले नाही." [* बहिष्कृत भारताने] (११६)

"तेव्हा 'कौन्सिलमें जाना हराम है' या घोषणांबरोबर 'कौन्सिलमें कौन जायेगा ? घेड जायगा. चमार जायगा.' * डॉ. आंबेडकर म्हणाले की..." [ अशाही घोषणा होत होत्या.] (१३९)

"देशद्रोही, हिंदू धर्माचे वैरी, ब्रिटिश सरकारचे बगलबच्चे अशी विशेषणे * लावून

आंबेडकर विरोधी वातावरण * तापवत नेले," [ * आंबेडकरांना, * काँग्रेसवाल्यांनी ] (१५४).

" ९ एप्रिल ४८ रोजी बाबासाहेबांच्या अध्यक्षतेखाली २० सदस्यांची सिलेक्ट कमिटी * नेमली व दिवसरात्र परिश्रम करून १२ ऑगस्ट १९४८ रोजी * बाबासाहेबांनी जे कष्ट घेतले त्याचे चीज या देशाच्या संसदेने केले नाही." [ * संसदेने, * सिलेक्ट कमिटीने आपला अहवाल दिला. ] (२३७)

वरील उदाहरणे अगदी वानगीपुरती आहेत. सर्वांनाच ती सर्व उदाहरणे दोषास्पद वाटतील, असे नाही. पण प्रत्येकाला काही उदाहरणे तरी खटकतील, याविषयी शंका नाही. भलत्या वेळी पदे अध्याहृत ठेवण्याची प्रवृत्ती हे या पुस्तकातील सदोष भाषेचे एक प्रमुख वैशिष्ट्य आहे.

पण लुप्तपदत्व हा एकच दोष या पुस्तकाच्या भाषेत नाही. अनेक दोषांनी ती लिडबिडलेली आहे. त्या दोषांचे वर्गीकरण करणे नि वर्गवार परिगणन करणे कठीण आहे. पण पुढे काही सदोष वाक्यरचना दिल्या आहेत त्यावरून या पुस्तकाची भाषा कशी दोषसंकुल आहे, त्याची कल्पना येऊ शकेल.

" जातिप्रथा श्रमिकांचे गट निर्माण **करतातच** [ करतेच ], पण याव्यतिरिक्त ती श्रमिकांच्या **गटाची** [ गटांची ] ...जन्मजात मतवारी लावून देणारी व्यवस्था आहे." (१२)

**ज्यांना** [ ज्या धर्मात ] पायातली वहाण म्हणून **वागवली जाते त्या धर्माच्या** रक्षणासाठी त्यांनी काय म्हणून मरावे ? (२३)

" फुले-आंबेडकरांनी आपल्या अनुयायांत **जी** आत्मसन्मानाची व स्वातंत्र्याची प्रेरणा निर्माण केली, **पण** त्यानंतर अनुयायांच्या मागोमाग ज्या पिढ्या उदयाला आल्या त्यांनी फुले-आंबेडकरांचा वैचारिक वारसा जतन केला पाहिजे..." [ वाक्य अधांतरी लोंबकळत राहते. ' जी ', ' पण ' इत्यादी शब्दांना काही अर्थ उरत नाही. ] ( ४३ )

" बाबासाहेबांनी **जी** साक्ष दिली **त्यामुळे**..." (७२)

" गुरेढोरे, पशुपक्षी व परधर्मीय **जे** पाणी निर्भयपणे पिऊ शकत होते **पण या** (त्या) पाण्याला स्पर्श करण्याची अस्पृश्यांना बंदी होती." ( ८५ )

" ...**अस्पृश्यांना त्यांचे** हक्क प्रस्थापित **करण्यासाठी** सरकारने खंबीर पावले उचलली पाहिजेत." [ अस्पृश्यांना आपले हक्क प्रस्थापित करता यावेत म्हणून सरकारने ]...(९०)

" ...यंत्रशक्ती व आधुनिक संस्कृतीच्या दुष्परिणामांची कठोर चिकित्सा **करण्यापेक्षा** बहुसंख्य लोकांना भोगाव्या लागणाऱ्या दुःखाचे मूळ येथील **समाजरचनेत आहे**." ( १४१ )

" **तुरुंगात** (तुरुंगातून) लिहिलेल्या पत्रात पुनः **त्यांनी** स्पष्ट केले, की पंतप्रधानांनी जर अस्पृश्यांसाठी स्वतंत्र मतदारसंघ जाहीर केला तर **मला** (आपल्याला) प्राणांतिक

उपोषण करावे लागेल." (१५६–१५७)

"...बाबासाहेबांनी जी शर्थीने झुंज दिली आणि अनेक ठिकाणी विखुरलेला अभावग्रस्त वंचित समाज एकजुटीने उभा राहतो न राहतो तोच राजा-मुंजे करार... यांनी दुहीची बीजे पेरली..." [ वाक्य फारच भरकटले. ] (१५७)

"या संघर्षाला उग्र रूप धारण केले होते." (१६९)

"...असे मत मांडून खानेसुमारी [ खानेसुमारीत ] अस्पृश्यांचे आकडे चुकीचे आहेत असे सांगितले." (२०५)

"जोपर्यंत अस्पृश्य गावकुसाबाहेर राहतात, त्यांना उदर-निर्वाहाचे साधन नाही व ते अल्पसंख्य आहेत त्यामुळे [ तोपर्यंत ] त्यांची अस्पृश्यता नाहीशी होणार नाही." (२०५)

"तद्यात आंबेडकरांनी सूचना केली होती की अल्पसंख्याकांना विधिमंडळात अधिक प्रतिनिधित्व देण्याची शिफारस केली होती." (२११)

"अस्पृश्य बांधवांचे प्रेम व निष्ठा एवढेच 'थॉट्स ऑन पाकिस्तान' हा मौलिक ग्रंथ प्रसिद्ध केला." [ !!! ] (२१३)

"...इस्लामी धर्म खऱ्या मुसलमानाला हिंदुस्थान ही मातृभूमी आहे नि हिंदू हा आपल्या इष्टमित्र आहे असे विचार त्याच्या मनासही शिवू देणार नाही." [ हिंदुस्थान ही आपली मातृभूमी आहे नि हिंदू हा आपला इष्टमित्र आहे असे विचार इस्लामी धर्म खऱ्या मुसलमानाच्या मनासही शिवू देणार नाही. ] (२१३)

"जे पक्षीय त्यांना लोकशाहीच्या आणि त्याप्रमाणे विरोधी पक्षाच्या अस्तित्वाच्या विरुद्ध आहेत त्यांना लोकशाहीचा अर्थच समजलेला नाही." [ ??!! ] (२२४)

"न्यायमूर्तींना परराष्ट्रीय वकील व तत्सम अन्य पद देऊ केले व ते काम पुरे होताच पुनः त्याने न्यायासन विभूषित करावे काय?" [ न्यायमूर्तींना परराष्ट्रीय वकील वा अन्य पद दिले गेले, तर ते काम पुरे होताच त्यांनी न्यायासन पुनः विभूषित करावे काय? ] (२३२)

"त्यांनी प्रत्येक खोली बंद केली व हायकोर्टाला भलेमोठे कुलूप लावून नाईटसाहेब लंडनला निघून गेले." [ नाईटसाहेबांनी प्रत्येक खोली बंद केली व हायकोर्टाला भले मोठे कुलूप लावून ते लंडनला निघून गेले ] (२३४)

"यापूर्वी त्यांनी नवी दिल्ली येथे...बौद्ध धर्मासंबंधी त्यांनी पहिले जाहीर भाषण केले होते." (२५७)

वाक्यरचनेखेरीज अन्यत्र आणखीही काही दोष या पुस्तकात सापडतात. पण दोष-दर्शन आणखी लांबविण्यात हशील नाही. या पुस्तकातील भाषादोषांचे विविधत्व, विपुलत्व नि गांभीर्य लक्षात घेता, असे वाटते की, भारदस्त नि प्रौढ मराठी वाङ्मयात अलीकडच्या दहापंधरा वर्षांत असे दुसरे पुस्तक निपजले नसावे. नव्या मराठीला

लाभलेला हा अनन्वय अलंकार असावा.

**रमामंगल, २९ सहवास संस्था, कर्वेनगर, पुणे ४११०२९**

[ परीक्षणलेखकाने लेखक, मुद्रक, मुद्रितशोधक या व्यक्तिसमूहाचा सुरवातीला उल्लेख केला आहे. त्या समूहात प्रकाशकाचाही समावेश करायचा किंवा कसे हीसुद्धा चिन्त्य बाब आहे.

कर्नाटक टूरिझमचा आपल्याला राग आला. ( पहा : **भाषा आणि जीवन** २ : २·२८–९, उन्हाळा १९८४; २ : ३·५१–२, पावसाळा १९८४, ) इतर काही जाहिरातदार-मंडळी भाषेची अशीच हेळसांड करतात असेही सांगण्यात आले.

प्रस्तुत प्रकरणी डॉ. द. न. गोखले यांनी अनुकरणीय अशी जागरूकता आणि पोटतिडीक दाखवली आहे.

' प्रस्तुत पुस्तक डॉ. बाबासाहेब आंबेडकरांविषयी असले तरी प्रस्तुत समीक्षेचा डॉ. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांशी यत्किंचितही संबंध नाही. ' असे एक विधान परीक्षण लेखकाने केले आहे. इतकी उघड अशी गोष्ट परीक्षण लेखकाला आवर्जूनका सांगावीशी वाटली ? ज्या ' एकूण परिस्थिती 'चा त्याने दुसऱ्या संदर्भात उल्लेख केला आहे तिचा याही ठिकाणी संबंध पोचतो का याचाही विचार व्हायला पाहिजे. ]

—संपादक

## आधारांच्या शोधात पृथ्वीप्रदक्षिणा

भारताचे एके काळचे महान्यायप्रतिनिधि (ॲटर्नीजनरल) श्री. सेटलवाड सर्वोच्च न्यायालयातली एक आठवण सांगत आहेत : " मी अमेरिकन पद्धतीचा निर्देश करून सांगितले की, अमेरिकेत देखील जबाबदार असलेली संबंधित कार्यकारी अधिकारयंत्रणा ही बँका बंद करण्याबाबत किंवा बरखास्त करण्याबाबत (लिक्विडेशन) पुढाकार घेऊ शकते. पीठावर न्यायमूर्ती कपूर होते. ते इंग्लंडमधील निवाड्यांचे, विशेषतः उमराव-सभेच्या निवाड्यांचे पक्षपाती पडले. मी अमेरिकन प्रकरणांचा हवाला देत आहे हे पाहून त्यांनी मला अडवले : " ॲटर्नीमहाशय, एवढा लांबचा पल्ला गाठायचं काय बरं कारण आहे ? घराच्या जवळपासचे आधार नाही का मिळण्यासारखे ? " मी लगेच जबाब दिला : " होय, महाराज. जपानमध्येही तीच स्थिती आहे. " न्यायालयात हास्याचा नुसता गजर झाला आणि कपूर यांनाही त्यात सामील झाल्यावाचून राहवले नाही. "

**( लॉ अँड अदर थिंग्ज, १९७१, पृ. ४६२–३ )**

# आरसे – पण पारा उडालेले !

**मालती शं. किर्लोस्कर**

परवा परवाचीच गोष्ट ! मनाला जरा विरंगुळा म्हणून मी जुनी पत्रे काढून वाचीत बसले होते. ती चाळताचाळता आमच्या सिंधुताईंचे पत्र हाती आले. ते त्यांनी मला चाळीसबेचाळीस वर्षांपूर्वी लिहिलेले होते. सिंधुताई म्हणजे माझ्या अर्थशास्त्राच्या प्राध्यापकांच्या पत्नी ! त्यांचा-आमचा चांगला घरोबा असल्याने अधूनमधून त्या मला आवर्जून पत्रे लिहीत. त्यांपैकीच हे एक पत्र होते. पत्रात त्यांनी लिहिले होते, " मालू, हे पत्र मी तुला लिहिले आहे ना, तेव्हा तुझे ' सर ' पेपर्स तपासण्यात बुडाले आहेत. ते वाचता वाचता खूप गमतीही पाहायला मिळताहेत. सेंट्रल बँकेवरचा प्रश्न आहे तो. त्यात शंभरात नव्वद मुलांनी एक वाक्य न चुकता लिहिले आहे, ते म्हणजे, ' सेंट्रल बँक इज बँकर्स बँक ! ' ते पाहून पाहूनसुद्धा मला इतका, इतका कंटाळा आला म्हणतेस म्हणून सांगू. मी चेष्टेने ' यांना ' म्हटले, ' अहो, ज्या विद्यार्थ्याने हे वाक्य लिहिले नसेल ना, त्याला ते न लिहिल्याबद्दल माझा म्हणून एक मार्क द्या बरं का ! ' त्यावर ' हे ' मनःपूर्वक हसले ! "

सिंधूताईंच्या पत्रातला विनोद सोडला तरी त्यांच्या म्हणण्यात खूपच तथ्य होते. केवळ परीक्षेत, तेही अर्थशास्त्र, भौतिकशास्त्रे किंवा गणित अशा वस्तुनिष्ठ विषयातच केवळ नव्हे, तर अगदी आपल्या दैनंदिन जीवनात आपल्या मनातला आशय आपण इतक्या कमालीच्या त्याच ठराविक शब्दात, ठराविक पद्धतीने, वर्षानुवर्षे व्यक्त करीत असतो, की शेवटी ते शब्द, अर्थव्यक्तीचे आपले सारे सामर्थ्यच गमावून बसतात, असे मला वाटते. उदाहरणार्थ, सकाळी उठून आपण वृत्तपत्र हाती घेतले म्हणजे विमान, रेल्वे, ट्रक, आग अशा कशाना कशामुळे झालेला अपघात बहुधा आपल्या वाचनात येतोच ! (' वाहन म्हणजे हटकून अपघात करणारे साधन ' असा शब्दार्थ शाळेत विद्यार्थ्यांना शिकवायला काही हरकत नाही, असे मला हल्ली वाटू लागले आहे.) अपघाताची बातमी मोठ्या अक्षरात, बहुतेक वेळा सचित्र छापलेली असते. कपड्यात गुंडाळलेले मृतदेह, वेडावाकडा पडलेला ट्रक इत्यादीसह ! ( सचित्र बातमी हे आधुनिक वृत्तपत्रविद्येचे एक प्रमुख लक्षण असावे. ) बातमीचा मजकूर साधारणपणे असा असतो : " अमूकअमूक गावी ( पुढे गावाचे नाव) लेव्हल क्रॉसिंगवर आगगाडी व ट्रक याची जोरदार टक्कर होऊन पंचवीस ठार व १२ जखमी ! (आकडा कमीजास्त ! त्याची चूकभूल द्यावी घ्यावी)... वाचलेल्यात एक... इतक्या महिन्याचे मूल आहे...

चौकशीसाठी संबंधित खात्याचे अधिकारी (पुढे कधी कधी त्याचे नाव, हुद्दा इत्यादी) तातडीने अपघातस्थळी रवाना झाले आहेत." यापुढचा मजकूर वाचण्याची तसदी मी घेतच नाही, कारण तो मजकूर मला पाठच असतो! तो सामान्यतः या छापाचा असतो : 'मृताच्या कुटुंबियांना प्रत्येकी चारशे व जखमींना प्रत्येकी दोनशे रुपये (या दोन्हीत एखाद् दुसरा शेकडा कमी जास्त) रेल्वे खात्याने नुकसानभरपाई म्हणून देऊ केले आहेत." अशी बातमी वाचली, की माझे मन आतल्या आत तडतडत चिडते. माझ्या मनात येते, अपघात न होतील याची खबरदारी घ्यायचे राहिलेच बाजूला, उलट माणूस मरायचाच अवकाश, रेल्वेखाते, सरकार यांचे रुपये-आण्याचे कोष्टक लगेच तयार! मृताचे वा जखमीचे आप्त, त्यांच्यावर अनपेक्षितपणे कोसळलेल्या आपत्तीने त्यांची होणारी व्याकुळ, निराधार अवस्था, याचे काही सोयरसुतक असते की नाही या खात्यांना? इतकी कशी त्यांची मने बधिर, बोथट आणि मख्ख?

० ० ०

चातुर्मास संपला, की लग्नमुंजींची आपल्याकडे एकच धमाल उडते. थोड्याफार प्रसिद्ध घराण्यातल्या मुलामुलींचे लग्न। मुंज असे मंगलकार्य झाले, की बहुधा त्याची बातमी छापून येतेच. विवाहाच्या बातमीत अनेकदा वधू-वरांची मुंडावळ्यासह छायाचित्रेही येतात. कधी कधी ती इतकी पुसट (किंवा पाठीमागच्या कागदावरच्याच छायाचित्राचा ब्लॉक त्यावर उमटलेला) असतात, की चिं. वि. जोशांच्या कथेतील 'मधुबाला'प्रमाणे या मधुबालातील वधू कोणती व वर कोणता हेही ओळखणे दुरापास्त होते. बातमीत दोन्ही पक्षातील प्रसिद्ध आप्तांची नावे, नाती इत्यादी लिहून बातमीदार हटकून म्हणतो, 'या समारंभास विविध क्षेत्रातील अनेक प्रतिष्ठित मंडळी हजर होती." ना त्या वाक्याच्या रचनेत थोडाफार बदल की ना त्या 'प्रतिष्ठित' शब्दाऐवजी 'नामवंत', 'थोर', 'मान्यवर' असा एखादा त्याच अर्थाचा शब्द! या वाक्याचा माझ्या मनाने इतका धसका घेतलाय, की अनेक परिचितांकडच्या कार्यांना जायचेच मी हल्ली टाळू लागले आहे. मला वाटते, दिवाकर यांच्या 'तेवढेच ज्ञानप्रकाशात' या नाट्यछटेच्या चालीवर 'तेवढेच प्रतिष्ठितांत' हा वार्ताहर आपल्यालाही ढकलेल एखादेवेळी! ते संकटच नको. विवाह-मंगलासारख्या व्यक्तीच्या जीवनातील हृद्य व मंगल प्रसंगाचे हे असले रटाळ वर्णन रसायनशास्त्रातील एच्टूओ म्हणजे पाणी या फॉर्म्युल्यासारखे मला अगदी तोंडपाठ होऊन गेले आहे, हल्ली!

माझ्या बासष्ट वर्षांच्या आयुष्यात सभासंमेलनांना जाण्याचे प्रसंग, माझ्यावर थोडे का आले असतील? तिथेही अनुभव हाच! स्त्रियांच्या शाळेत, महाविद्यालयात, मंडळात किंवा अशाच एखाद्या संस्थेत आपण श्रोता म्हणून गेलो आणि अध्यक्षस्थानी कोणी सद्गृहस्थ असले की ते बहुधा पुढचे वाक्य सबंध भाषणात आपल्याला किमान एकदा तरी ऐकवणारच! ते म्हणजे, "भगिनींनो, स्त्री म्हणजे संसाररूपी रथाचे एक चाक

आहे." फुटलेल्या ग्रामोफोनच्या तबकडीवरची सुई जशी एकाच जागी मागेपुढे होत राहून 'कशी बाई जाऊऽऽ मी कुंजवना ? कुंऽऽ जवना' किंवा अशीच दुसरी काहीतरी ओळ पुनःपुन्हा ऐकवत राहाते ना, तसे हे शेकडो वेळा ऐकलेले वाक्य माझ्या कानांना शीण आणते. गोलघुमटात एकदा उच्चारलेला शब्द सातदा ऐकायला येतो म्हणतात, तशी माझी स्थिती होते. मी स्वतःशीच पण वक्त्याला उद्देशून (अर्थातच मनातल्या मनात) म्हणत असते, 'अहोऽ बाबा, (अध्यक्ष स्त्री असल्यास अहोऽ बाई,) जरा तुमचे उपमान तरी बदला की हो. स्त्रीला पाहिजे तर संसाररूपी चित्राची फरेम म्हणा, संसाररूपी वस्त्राचे अस्तर म्हणा, चालेल आम्हाला, तेवढाच जरा 'चेंज' होईल आणि काय हो, तुमचा हा रथ आणि त्याचे चाक इतकी वर्षानुवर्षे चालून अजून दमली कशी नाहीत म्हणते मी!"

अशा सभा-संमेलनातून आणखीही दोन बिकट संकटांना तोंड द्यावे लागत असते. ते प्रसंग म्हणजे अध्यक्षांचा परिचय व सर्वांचे आभार यांचे! परिचय करून देणाऱ्याच्या मते समारंभाला आलेले अध्यक्ष, अध्यक्षा यांचा वेळ हा नेहमी 'बहुमोल' किंवा 'अमूल्यच'च असतो. (त्यात 'मू' चा उच्चार ऱ्हस्व केल्यामुळे पाणिनीपासून मोरो केशव दामल्यांपर्यंतचे सर्व व्याकरणकार कपाळावर हात मारून घेऊन मनात काय म्हणत असतील, कोण जाणे!) पुष्कळदा वस्तुस्थिती अशी असते, की हे अध्यक्ष महाशय स्वतःचा वेळ कसा घालवावा या चिंतेत असतात किंवा आपल्या गावी पत्ते, बुद्धिबळ खेळत किंवा अलीकडे टेलिव्हिजन बघत घालवीत असतात. तरीही त्यांचा वेळ 'अमूल्य'च हं. आभारप्रदर्शन करणारी व्यक्ती आपल्या खुर्चीवरून उठून सभास्थानी येताना दिसली, की बसलेले श्रोते लवकरात लवकर उठून सभागृहाबाहेर कसे पडता येईल, याचा रस्ता व संधी शोधू लागतात. त्यांच्या या घबराटीचे कारण एकच असते ते म्हणजे ती व्यक्ती आता म्हणणार, "आता मी शेवटचे आभाराचे गोऽऽड काम करायला उभा। उभी राहिलो। राहिले आहे." हे शब्द कानांवर पडले, की श्रोत्यांना (अध्यक्षांनासुद्धा पुष्कळदा) आभाराचा भार होऊ लागतो आणि ते 'गोऽऽड' काम करणारी व्यक्ती लवकर खाली बसली तर अधिक 'गोड गोड' वाटण्याची शक्यता असते.

भयंकर या शब्दाची बिचाऱ्याची दशा तर अधिकच 'भयंकर' असते. एखाद्या चित्रपटशौकिनाला चित्रपटाच्या पहिल्याच खेळाला तो जाऊन परतल्यावर आपण ओसंडणाऱ्या उत्साहाने विचारायला जावे, "कसा होता रे पिक्चर?' तो उत्तर देतो, "भयंकर सुंदर.' किंवा नुकतीच वधूपसंती करून आलेल्या आपल्या स्नेह्याला आपण उत्कंठेने विचारावे; "कशा आहेत आमच्या भावी वहिनी?' की तो काहीसा लाजत, पण फार खुशीत सांगतो, "भयंकर छान!' भलत्याच ठिकाणी बसलेला हा 'भयंकर' शब्द ऐकला म्हणजे एखाद्या उंची मखमली, प्रशस्त गालिचावर एखादा बेडूक मध्येच

येऊन बसावा ना, तसे मला वाटते. इतका तो शब्द कानाला विद्रूप लागतो. आणि मग एक सलज्ज, मुग्ध, विवाहोत्सुक, तरतरीत, कमीजास्ती सुस्वरूप अशी नवयौवना माझ्या मनश्चक्षूंपुढे उभी राहण्याऐवजी एखादी 'त्राटिका' किंवा आक्राळविक्राळ 'चामुंडा'च येऊन उभी ठाकते. यात माझा बिचारीचा हो काय दोष ? दोष द्यायचाच असेल तर त्या 'भयंकर' शब्दाला द्या.

०० ०० ००

इतर अनेक व्यावसायिकांप्रमाणे आम्हा शिक्षक, प्राध्यापकांच्याही संघटना आता ठिकठिकाणी होऊ लागल्या आहेत. एकपरी त्या उपकारक व उपयुक्तही आहेत. आमच्याही आता परिषदा भरतात, शिबिरे होतात, चर्चा घडतात. अशा कार्यक्रमांना प्रमुख पाहुणे म्हणून कधी शिक्षणमंत्री तर कधी त्यांचे सचिव किंवा असेच कोणीतरी 'उच्चपदस्थ' येतात. ते बहुतेक वेळा रुक्ष, कंटाळवाणा, आमच्या सुखदुःखाशी व वास्तव प्रश्नांशी बेतांचीच जवळीक साधणारा असा उपदेशाचा घुटका आमच्या गळी उतरवतात ('मुकी बिचारी कुणी हाका...' ही कवितेची ओळ, तो घुटका गिळताना मनात सारखी आठवत असते.) भाषणात एकदा तरी ते म्हणतात, "तुम्ही शिक्षक, प्राध्यापक म्हणजे राष्ट्राचे शिल्पकार आहात. नवी तरुण पिढी तुम्हीच घडविणार आहात. इ..." भाषण संपल्यावर हारतुरे सोबतच्या सेवकाकडे देऊन चहापाणी आटोपून पाहुणे कर्तव्यपूर्तीच्या आनंदात स्वगृही परततात. पण स्वगृही येऊन बिछान्यावर अंग टाकले तरी माझ्या मनात त्यांचे शब्द सारखे डोकावत राहतात. खेड्यात किंवा लहान गावात मुलीला पाहायला नवरा मुलगा प्रथम येतो तेव्हा स्वयंपाकघरातून तिच्या एकेक नातेवाईक स्त्रिया किंचित् डोकावून डोकावून जातात ना, तसेच त्या शब्दांचेही होते. दरवेळी ही वाक्ये ऐकताना (आजवर किमान शेकडो वेळा तरी मी ती ऐकली आहेत) माझ्या नजरेसमोर महाराष्ट्रातला काळाकभिन्न खडक, प्रचंड हातोडी छिन्नी हातात घेतलेली मी व वेड्यावाकड्या आकाराचे फोडून पडलेले दगड यांचीच चित्रे तरळू लागतात. मधूनच तरुण विद्यार्थी- विद्यार्थिनींचा निरागस चेहरा दिसू लागतो व हे 'पाथरवटाचे' काम आपल्याला जमलंच नाही तर आपले कसे होणार या विवंचनेने माझा जीव उडून जातो. वाटते, सभा चालू असताना आपण शिष्टाचाराचे सर्व नियम घटकाभर गुंडाळून ठेवायला हवे होते व भर सभेत उठून अध्यक्षांकडे वळून म्हणायला हवे होते, 'अध्यक्ष महाराज। बाईसाहेब, आम्हा शिक्षक-प्राध्यापकांची आपणास नम्र विनंती (विनंती ही नेहमी 'नम्र'च असायला हवी बरे.) की या पाथरवटाच्या उपमेच्या कडक पिंजऱ्यातून आम्हाला एकदा सोडवा हो. जग आता कॉम्प्युटरच्या युगातून चाललेले आहे. जेट, बोईंग विमानाच्या युगातून जाते आहे. तेव्हा आम्हाला 'इन चार्ज ऑफ कॉम्प्यूटर' असे तरी म्हणा, निदान वैमानिकाची तरी उपमा द्या. तेवढेच आम्ही विमानात बसू. एकविसाव्या शतकाची मौज पाहू.

सध्याच्या महागाईमुळे एरवी आम्ही बापडे शिक्षक-प्राध्यापक विमानात कुठून बसणार ? आमचे विद्यार्थीही वर्षानुवर्षे 'दगडा'च्या उपमेखाली चिरडून गेले आहेत. तेही जरा मोकळी हवा खातील विमानात बसून ! पण 'सभ्य'पणाच्या दडपणामुळे हे सगळे मनातच राहते.

मी 'किर्लोस्कर' कुटुंबाची, म्हणजे 'कारखानदार' कुटुंबाची एक घटक. त्यामुळे नोकरी मागण्यासाठी माजी विद्यार्थ्यांपासून मी किराणा वा स्टेशनरी माल घेते त्या दुकानातील सेवकांच्या आप्तापर्यंत नानाविध क्षेत्रांतील मंडळी मला पत्रे धाडतात. वर्षाकाठी पाच-पन्नास तरी अशी पत्रे मला येतातच. कारखान्यात यंत्रे असतात व कामगार ती चालवतात, एवढेच माझे या विषयातले गाढ (?) ज्ञान ! पण लिहिणारा 'मी टर्नर आहे, फिटर आहे, लेथ चालवू शकतो, डी. एम. ई. आहे आहे असे मला अनाकलनीय असे बरेच लिहून माझी खरीखोटी स्तुती करून पत्राच्या शेवटी मला विनवितो, "पत्राचे उत्तर त्वरित पाठवावे. मी चातक पक्षाप्रमाणे आपल्या पत्राची वाट पाहत आहे." मला वाटते, या मंडळींना एकदा झडझडून विचारावे, काही, तुम्ही चातक पक्षी पाहिला आहेत का कधी ?" मला खात्री असते, माझ्या प्रश्नाचे उत्तर 'नाही' असेच असणार. समजा, यांनी कुणी पाहिला असलाच तो चातक पक्षी तर अमूक प्रकारची त्याची मुद्रा म्हणजे 'वाट पाहण्याची' हे यांना कसे कळले असेल ? पण जाऊ द्या, उगीच कशाला अवघड प्रश्न विचारून मी त्यांना अडचणीत टाकू ? कारण मला तरी कुठे माहिती आहे तो चातक पक्षी ? पुन्हा मनात येते माझ्या, त्यांना सांगावे, "मंडळी हो, चांगला माणसांचा, दुर्लभ, असा जन्म देवाने तुम्हाला दिला आहे तो टाकून कशाला जाताय चॅक चॅक करायला चातकाच्या जन्माला ? (तो पक्षी असा आवाज करीत असेल हा माझा कल्पनाविलास !!) यापेक्षा, 'उन्हाळ्याच्या सुट्टीत रेल्वे स्टेशनवर आगगाडीची किंवा लग्नसराईच्या दिवसात बसथांब्यांवर बसची आपण जशी वाट पाहतो ना तशी मी तुमच्या पत्राची वाट पाहतो आहे,' असे तरी लिहा, म्हणजे स्वानुभवाने मला तुमची आतुरता लग्गेच कळेल."

०० ०० ००

अशी किती उदाहरणे द्यावीत ? वस्तुतः ध्वनी ही सर्व प्राणिमात्राप्रमाणे निसर्गाने मानवाला दिलेली एक थोर देणगी. तिच्या आधाराने मानवाने स्वकष्टाने, बुद्धीने निर्मिलेली संपदा म्हणजे भाषा. आपले मनोगत उत्कटपणे, प्रभावीपणे दुसऱ्याला कळावे, त्याचे सुखदुःख, भावनावेग, विचारविलास, कल्पनावैभव ही समजावी म्हणून तर भाषेचा जन्म ! तिच्यामध्ये एकाच अर्थाच्या अनेक शब्दांचे केवढे तरी समृद्ध भांडार असते. एकाच अर्थाच्या सूक्ष्म, सूक्ष्मतर छटाही ती मोठ्या कौशल्याने दाखवीत असते. एक 'सौंदर्य'भावना वर्णन करायची म्हटले तरी 'रमणीय, मनोहर, देखणे, चित्तवेधक, शोभिवंत, आकर्षक, सुकुमार' असे कितीतरी चकचकीत बंदे रुपये भाषेच्या खजिन्यात

असताना पुन्हापुन्हा त्या ' मस्त ' शब्दालाच कशाला वेठीला धरायचे ? शब्दांबाबत-देखील इतका कंजुषपणा कशाला हवा ? त्यामुळे कांद्याचे पिठले किंवा भाजीही ' मस्त 'च आणि शरदाचे टिपूर चांदणेही ' मस्त 'च ठरते. ( पिठले आणि चांदणे हे दोन शब्द चुकून जवळ आले तरी मऊमऊ हिरवळीवर चालत असताना भस्सदिशी पायांत काटा घुसल्यासारखे नाही तुम्हाला वाटतं ? )

संतांनी शब्दांना रूप-रस-गंधही असतात असे म्हटले आहे. पण वर उल्लेखिलेल्या पद्धतीने आपल्या दैनंदिन जीवनात-व्यवहारात आपण शब्दांचा, वाक्यांचा असा कंटाळ-वाणा व नीरस वापर करीत राहिलो, तर त्या शब्दांतून जाणवणाऱ्या भावनांचे, अर्थांचे अत्तर आपल्याला कधी गवसेल काय ? शब्दाचा डौल, त्यांचे लालित्य, त्यांचे सामर्थ्य, त्यांची अर्थप्रकटीकरणाची चतुराई व क्षमता यांचा प्रत्यय यथार्थपणे आपल्याला कधी येईल काय ? अनेक मनांना जोडणारा सेतू म्हणजे भाषा याची प्रचीती अशाने कशी येईल ? वस्तुतः अन्न म्हणजे शरीराचे पोषण करणारा पदार्थ ! पण तो अती शिजवला की त्यातली पोषक द्रव्येच नाहीशी होतात ! भाषेचेही तसेच नाही का ?

आरशाचे काम काय ? त्यात पाहणाऱ्याचे यथार्थ प्रतिबिंब दाखविणे. खरे ना ? पण फुटका व पारा उडून गेलेला आरसा ते काम नीट थोडेच बजावतो ! मग ज्या शब्द-प्रयोगांचा मी वर उल्लेख केला ते शब्दप्रयोग मला पारा उडालेल्या आरशासारखेच वाटतात असे म्हटले, तर चुकले काय ?

**पसायदान, विश्रामबाग, सांगली ४१६ ४१५ (विलिंग्डन महाविद्यालयातून निवृत्त)**
**पूर्वप्रसिद्धी : रविवार सकाळ (कोल्हापूर) १९८६.०३.१६ अनुमतिपूर्वक पुनर्मुद्रण.**

## कॉन्फिपरसी ऑव्ह सायलन्स

सर ल्यूइस मॉरिस नावाचा एक बेतास बात कवी होता. पण आपल्याला टेनिसन-नंतर राजकवी म्हणून नेमले जावे अशी आकांक्षा तो बाळगून होता. एकदा ऑस्कर वाइल्ड या प्रसिद्ध लेखकाशी बोलताना त्याने आपले गाऱ्हाणे गायले. " लोक माझा मत्सर करतात आणि एखादा कट करावा तसे माझ्या काव्यांबद्दल मौन बाळगतात आता मी करू तरी काय ? "

" कटात सामील व्हा ना ! " वाइल्डने शांतपणे उत्तर दिले.

## लेखनविवेक / स्वल्पविराम आणि समयोगी रचना

‘इंग्रजी, मराठी आणि हिंदी’ या शब्दरचनेत ‘इंग्रजी’, ‘मराठी’, ‘हिंदी’ समयोगी आहेत. प्रश्न असा आहे की यात स्वल्पविराम एकदा द्यायचा (‘इंग्रजी’ नंतर) किंवा दोनदा द्यायचा (‘इंग्रजी’ नंतर, ‘मराठी’ नंतर) ?

इंग्रजी, मराठी आणि हिंदी ( पर्याय १ )

इंग्रजी, मराठी, आणि हिंदी ( पर्याय २)

इथे एक लक्ष्यात घ्यायचे की फक्त दोनच समयोगी घटक असले तर प्रश्न येत नाही. स्वल्पविराम येत नाही.

मराठी आणि हिंदी (शक्यता १)

दोनपेक्षा अधिक घटक असले तर वाद येतो आणि तो वाद तसा जुना आहे. हर्बर्ट स्पेन्सर ( १८२० - १९०३) या इंग्लिश विचारवंताने यात लक्ष घालून दुसऱ्या पर्यायाच्या बाजूने कौल दिला होता. ज्यांना वादात रस नसेल त्यांच्यासाठी प्रथम माझी शिफारस सांगून टाकतो. ती म्हणजे पर्याय २.

त्याला इंग्रजी, मराठी, हिंदी या भाषा येतात. ( शक्यता २)

त्याला इंग्रजी आणि मराठी आणि हिंदी या भाषा येतात. (शक्यता ३)

त्याला इंग्रजी, मराठी, आणि हिंदी या भाषा येतात. (शक्यता ४)

या उदाहरणांना अनुसरून लेखन करावे. म्हणजेच पर्याय २ स्वीकारावा. ‘आणि’ च्या जागी ‘व’, ‘किंवा’ सारखी इतर समयोगवाचक अव्यये आली तरी यात काही फरक पडत नाही. समयोगी शब्द किंवा समयोगी शब्दसमूह ( व्याकरणात त्यांना आपण पदबंध म्हणू ) यात काही अंतर नाही

लाल, फिकट निळ्या, किंवा दाट जांभळ्या रंगाच्या साड्या. समयोगी वाक्ये असली आणि ती छोटीछोटी नसली तर स्वल्पविरामाच्या जागी अर्धविराम येईल एवढेच.

मी आलो, पाहिले, आणि जिंकलो.

मी बाहेरून आलो; तो अगोदरपासूनच येऊन बसला होता; आणि नंतर आम्ही दोघे आतल्या खोलीत शिरलो. समयोगी पदबंधांच्या पोटात समयोगी पदबंध आला तरी मूळ नियमात काही फरक पडत नाही.

काळ्या, जांभळ्या आणि पिवळ्या, आणि पोपटी साड्या म्हणजे रंगाला अनुसरून साड्यांचे तीन प्रकार झाले, चार नाही. आता पर्याय १ किंवा पर्याय २ या वादाकडे वळू. पर्याय १ स्वीकारणारी मंडळी म्हणतात की ‘आणि’, ‘व’ इत्यादी समयोगवाचक अव्ययांपूर्वी कधीच स्वल्पविराम देऊ नये. त्यांचे म्हणणे की, शक्यता ३ पासून सुरुवात

करावी. तिच्यामधल्या ‘ आणि ’ ऐवजी स्वल्पविराम घालत गेले की शक्यता २ किंवा शक्यता ४ निघतात. जिथे ‘ आणि ’ टिकवून धरला आहे तिथे स्वल्पविराम कशाला घालायचा ?

यावर पर्याय २ स्वीकारणारी मंडळी दोन मुद्दे मांडतात. पहिला मुद्दा हा की स्वल्प-विराम उच्चार तोडण्यासाठी येतो.

मराठी आणि हिंदी (शक्यता १)

इंग्रजी । मराठी । हिंदी ( शक्यता २ )

इंग्रजी आणि मराठी आणि हिंदी -- किंवा :

इंग्रजी । आणि मराठी । आणि हिंदी (शक्यता ३)

इंग्रजी । मराठी । आणि हिंदी (शक्यता ४)

जिथे दंडाने दाखवलेली तोडणी आवश्यक आहे तिथे स्वल्पविराम घालावा, इतर ठिकाणी विरामचिन्ह नको. शक्यता ३ चा उच्चार पाहिला तर स्वल्पविराम हा ‘ आणि ’ ऐवजी येत आहे हा मुद्दा टिकत नाही.

दुसरा मुद्दा हा की पर्याय १ स्वीकारला तर तो शेवटच्या दोन उदाहरणांना लागू करताना अडचणी येतात. उलट पर्याय २ स्वीकारला तर अशा अडचणी येत नाही.

मी बाहेरून आलो; तो अगोदरपासून येऊन बसला होता

आणि नंतर आम्ही दोघे आतल्या खोलीत शिरलो.

यातून दुसरे आणि तिसरे पोटवाक्य अधिक निकट जोडलेली आहेत; पहिले पोटवाक्य मात्र तितके निकट जोडलेले नाही असाही अर्थ निघतो. लेखन संदिग्ध होते. गणिताच्या भाषेत —

(क) + (ख) + (ग) – किंवा :

(क) + (ख + ग)

असे दोन अर्थ निघतात.

काळ्या, जांभळ्या आणि पिवळ्या आणि पोपटी साड्या यातही तीन अर्थ निघतात.

(का) + (जां + पि + पो)

(का) + (जां + पि) + (पो)

(का) + (जां) + (पि + पो)

प्रत्यक्ष उच्चाराने ही संदिग्धता दूर होऊ शकते. पर्याय २ मुळे हे नेमके स्पष्ट होते.

काळ्या, जांभळ्या आणि पिवळ्या आणि पोपटी

काळ्या, जांभळ्या आणि पिवळ्या, आणि पोपटी

काळ्या, जांभळ्या, आणि पिवळ्या आणि पोपटी

म्हणजे पर्याय १ त्याज्य, फार तर क्षम्य समजावा.

( रूढीला धरून म्हणून क्षम्य ) पर्याय २ ग्राह्य समजावा.

**अशोक रा. केळकर**

# मराठी मधले भाषाविषयक लेखन १९८५

'भाषा आणि जीवन'च्या अंक ३ : १ आणि ३ : ३ मध्ये सन १९८१, १९८२ आणि १९८३, १९८४ मधील भाषाविषयक लेखनाच्या सूची दिलेल्या आहेत. त्याच पद्धतीने सन १९८५ ची सूची येथे देत आहोत. वाचकांनी तीमध्ये काही नोंदी राहून गेल्या असल्यास जरूर सुचवाव्यात.

१९८५

— / मराठीमधले भाषा विषयक लेखन १९८१-८२/
भाषा आणि जीवन / ३ : १ / हिवाळा १९८५

— / मराठीमधले भाषाविषयक लेखन १९८३-८४/
भाषा आणि जीवन / ३ : ३ / पावसाळा १९८५

— / वाचा शिक्षणासाठी हक्क साधन / दै. लोकसत्ता / १९८५·१०·२७

अडोणी दा. ल. / ज्ञानेश्वरांचा भाषाविचार (विचारसंकलन) / भाषा आणि जीवन / ३ : ३ / पावसाळा १९८५

अर्जुनवाडकर कृ. श्री. / मराठी व्याकरणाची वाटचाल / भारतीय इतिहास आणि संस्कृती संपा० वाळिंबे रा. शं., आपटे प्र. पां., परचुरे / पुणे : बाबासाहेब आपटे स्मारक समिती / १९८५

आचार्य माधव ना. /... दिव्या गीर्वाणभारती (जाता जाता)/ भाषा आणि जीवन / ३ : २ / उन्हाळा १९८५

आचार्य माधव ना. / मराठी वाक्यरचना आणि प्रयोगांतर (भाषा निरीक्षण) / भाषा आणि जीवन / ३ : १ / हिवाळा १९८५

आत्राम व्यंकटेश / गोंडी भाषेच्या व्याकरणाचे स्वरूप / जंगो राईताड ( गोंडी साहित्य प्रकाशनाचे पाक्षिक ) / २ : ७. १-४, १९८५.०७.०१; २ : ८. १, ४, १९८५. ०७.१६; २ : ९. ३, १९८५. ०८. ०१; २ : १०. ब-क, १९८५.०८. १५; २ : ११. २-३.१९८५.०९.०१; २ : १२. २.४, १९८५.०९.१६.

आपटे वि. द. / वीजक विज्ञान, संगणक आणि मराठी / साधना / १९८५.०७.४

ऊर्ध्वरेषे प्रभाकर / परभाषातील नावांचे उच्चार कसे करावे ? प्रसारमाध्यमांच्या समस्या व उपाय / भाषा आणि जीवन / ३ : १ / हिवाळा १९८५

कानडे मु. श्री. / रामदासांचा भाषाविचार (विचारसंकलन ) / भाषा आणि जीवन / ३ : २ / उन्हाळा १९८६.

काळे कल्याण / भाषा वैज्ञानिक संशोधनाची काही क्षेत्रे / भाषा व साहित्य संशोधन,

खंड २ रा. संपा. जोशी वसंत स. आणि जोगळेकर गं. ना. / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे– ३० / १९८५
काळे कल्याण / राजसंन्यासचे भाषावैभव / महाराष्ट्र साहित्य पत्रिका / अंक २३२-३३ / जाने. ते जून १९८५.
कुलकर्णी सु. बा. / मराठीची व्याकरण परंपरा / Souvenir : The fourteenth All-India Conference of Linguists, Nagpur / 1985
केळकर अशोक रा. /... आणि भाषिक स्वाधीनता (संपादकीय) भाषा आणि जीवन / ३ : ४ / दिवाळी १९८५.
केळकर अशोक रा. /... आणि भाषिक बंधुता (संपादकीय) / भाषा आणि जीवन / ३ : ४ / पावसाळा १९८५
केळकर अशोक रा. / काळाची एक शैक्षणिक गरज (संपादकीय) / भाषा आणि जीवन / ३:१ / हिवाळा १९८५
केळकर अशोक रा. / भाषिक समता (संपादकीय) / भाषा आणि जीवन / ३ : २ / उन्हाळा १९८५
केळकर अशोक रा. / मराठी भाषेतील पदक्रम (भाषानिरीक्षण) / भाषा आणि जीवन / ३:४ / दिवाळी १९८५
खडपेकर श्रीकृष्ण / शब्दांचे वेड / भाषा आणि जीवन / ३:१ / हिवाळा १९८५
गोखले द. न. / डॉ. केतकरांच्या भाषाविषयक विचारांबद्दल आणखी थोडेसे (साद आणि प्रतिसाद) / भाषा आणि जीवन / ३:१ / हिवाळा १९८५
गोखले द. न. / मराठीतील संज्ञापनविशेष / भाषा आणि जीवन / ३:२ / उन्हाळा १९८५.
गोखले श्रीधर बी. / Prosodic Systems in Marathi and Marathi English / CIEFL, Hyderabad / Ph. D. Dissertation, 1984. (accepted 1985)
गोगटे मधुकर ना. / उत्कर्षासाठी, ऐक्यासाठी रोमन लिपी / दहा दोन तीन (पाक्षिक, स्थळ नादुरा ४४३४०४) / १९८५.०९.०५ (शिक्षकदिन विशेषांक)
गोगटे मधुकर ना. / भारतीय भाषांसाठी रोमन लिपीच बरी / लोकसत्ता / १९८५.९.०४.
गोगटे मधुकर ना. / मराठीचा बेडूक फुगेल तरी किती ? / लोकसत्ता / १९८५.०४-.०१
गोगटे सुधा / मराठी भाषेचा वापर : एक टिपण (भाषाविवेक) / भाषा आणि जीवन / ३ : ४ / दिवाळी १९८५
गोरे माधवराव (मुलाखत) / भाषा शिक्षणाचे आपले तंत्रच चुकतेय / मुख्य लेख :

–शैक्षणिक गुलामगिरी कधी संपणार? (शब्दांकन : प्रदीप वर्मा) / लोकप्रभा, मुंबई / १९८५.०८.१८.

जोग के. पां. / मराठीचा ऐतिहासिक शब्दकोश / आलोचना / एप्रिल १९८५

जोगळेकर द. ज. / वैज्ञानिक परिभाषा / युगवाणी / ४१ : ७-८ / जुलै–ऑगस्ट १९८५

जोशी दिलीप / आम्ही (ही) मराठीतूनच शिकलो / लोकप्रभा, मुंबई / १९८५·०८·१८

जोशी राम (मुलाखत) / 'विचारशील माणूस की यंत्रवत् रोबो? प्रश्न पर्यायाचा आहे—" / मुख्य लेख– शैक्षणिक गुलामगिरी कधी संपणार? (शब्दांकन : प्रदीप वर्मा) / लोकप्रभा, मुंबई / १९८५ ·०८.१८

जोशी वसंत स. आणि जोगळेकर गं. ना. / भाषा व साहित्य : संशोधन, खंड २ रा / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ४११०३० / १९८५

जोशी श्रीपाद / नॅशनल बुक ट्रस्टने प्रसिद्ध केलेले अनुवाद / नवभारत / सप्टेंबर १९८५

झाडे सी. मो. / संस्कृतभाषा सुलभ पण विद्यार्थी उदासीन का? / शिक्षण समीक्षा, नागपूर / ऑक्टोबर–नोव्हेंबर १९८५

तोरसेकर भाऊ / मातृभाषेला पर्याय नाही / लोकप्रभा, मुंबई / १९८५. ०८·१८

त्रिलोकेकर पुष्पा / परभाषेची ही ऐच्छिक गुलामगिरी हवी कशाला? / लोकप्रभा, मुंबई / १९८५·०८·१८.

दाभोळकर, नरेंद्र / न्यायालये व मराठी / रविवार सकाळ (पुणे) / १९८५. ०६·१६.

देव विजया / थोडे शब्दकोशांविषयी / भाषा आणि जीवन / ३:२ / उन्हाळा १९८५

देव विजया / विशेषणे आणि पुरुष (साद आणि प्रतिसाद)/ भाषा आणि जीवन / ३:१ / हिवाळा १९८५

धोंगडे रमेश वा. / मर्ढेकरांची कविता : एक शैलीवैज्ञानिक दृष्टिकोन : (समीक्षा) / आलोचना / ऑगस्ट १९८५

धोंगडे रमेश वा. आणि केळकर अशोक रा. / मराठी शैलीविचार / डेक्कन कॉलेज, पुणे ६ / १९८५

धोंगडे रमेश वा. आणि धोंगडे अश्विनी / मराठी भाषा आणि शैली / दिलीपराज प्रकाशन, पुणे / १९८५

धोंगडे रमेश वा. / वाङ्मय आणि शैलीविज्ञान : भाषावैज्ञानिक दृष्टिकोण / भाषा व साहित्य, संशोधन खंड २ रा / संपा० जोशी वसंत स. आणि जोगळेकर गं. ना. / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ४११ ०३० / १९८५

नारळीकर जयंत ( मुलाखत ) / मातृभाषेतील शिक्षणाखेरीज दुसरा पर्याय नाही. / मुख्य लेख शैक्षणिक गुलामगिरी कधी संपणार ? ( शब्दांकन– प्रदीप वर्मा ) / लोकप्रभा, मुंबई / १९८५.०८.१८

नारळीकर मंगला (मुलाखत) / मातृभाषेतील शिक्षणाखेरीज दुसरा पर्याय नाही. / मुख्य लेख : शैक्षणिक गुलामगिरी कधी संपणार ? (शब्दांकन : प्रदीप वर्मा) / लोकप्रभा, मुंबई / १९८५.०८.१८.

निमकर श्रीधर / 'शब्दांचे वेड;' एक प्रतिक्रिया ( साद आणि प्रतिसाद ) भाषा आणि जीवन / ३ : ४ / दिवाळी १९८५

नेमाडे भालचंद्र / भारतीयांचे इंग्रजी लेखन / नवभारत / ऑक्टोबर–नोव्हेंबर १९८५

नेमाडे भालचंद्र / भाषांतर मीमांसेचे स्वरूप / संशोधनाची क्षितिजे (डॉ. वि. भि. कोलते अमृतमहोत्सव गौरवग्रंथ) / अमेय प्रकाशन. नागपूर १९८५

पराडकर मो. दि. / एका अद्वितीय कोशग्रंथाची सांगता / महाराष्ट्र साहित्य पत्रिका / अंक २३२–३३ / जाने. – जून १९८५

पंतोजी / गमभन / कृ. सा. न. वि. वि.; क. लो. अ. हे. वि., थो. न. ल. आ. / ललित / सप्टेंबर १९८५

पंतोजी / गमभन / 'फक्त' आणि 'च' (आणि 'सुद्धा') / ललित / एप्रिल १९८५

पंतोजी / ग म भ न / मराठीचे प्राण वाचवा / ललित / ऑक्टोबर १९८५

पंतोजी / ग म भ न / मराठीचे भाग्यविधाते ( मराठीच्या मुद्रणातील चुका / ललित / जुलै १९८५

पंतोजी / ग म भ न / व्याकरण आणि तर्कशास्त्र / ललित / ऑगस्ट १९८५

पंतोजी / ग म भ न / शाळा आणि शास्त्र ( संयुक्त क्रियापदे ) / ललित जून १९८५

पंतोजी / ग म भ न / संयुक्त क्रियापद : एक भानगड / ललित फेब्रुवारी १९८५

पाटील न. ब. / भाषा, लोकभाषा आणि परिभाषा / 'संशोधनाची क्षितिजे' (डॉ. वि. भि. कोलते अमृतमहोत्सव गौरवग्रंथ ) / अमेय प्रकाशन, नागपूर / १९८५

पारखे व. वि. / महानुभावीय सांकेतिक लिप्या : काही विचार व त्याचा परिचय / भाषा व साहित्य : संशोधन खंड २ रा / संपा० जोशी वसंत स. आणि जोगळेकर गं.ना. महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ४११ ०३० / १९८५.

पुंडे दत्तात्रय दिनकर / राज्य परिवहन मंडळ : निषेध आणि अभिनंदनही (ज्याची त्याची प्रचीती ) / भाषा आणि जीवन / ३:४ / दिवाळी १९८५

प्रधान ग. प्र. / राजकारणातील भाषा / भाषा आणि जीवन / ३:२ / उन्हाळा १९८५

बर्वे राजेंद्र / शिक्षणाचे माध्यम व बुद्धी / लोकप्रभा, मुंबई / १९८५.०८.१८.

भडाळकर तारा / मायबोलीमधले धक्के आणि हिसके ( ज्याची त्याची प्रचीती )/ भाषा आणि जीवन / ३:२ / उन्हाळा १९८५

भाटे सरोजा / संस्कृत भाषा आणि संगणक (भाषावार्ता) भाषा आणि जीवन / ३:४ / दिवाळी १९८५

भावे स. शि. / भाषा, साहित्य आणि कविता / कवितारती / १:१ / नोव्हेंबर-डिसेंबर १९८५

मराठे ह. मो. / मराठीसाठी काय कराल? / दै. लोकसत्ता (रविवारची आवृत्ती) / १९८५.०९.१५

प्रतिक्रिया : पाटील जगन्नाथ ज. / दै. लोकसत्ता. (रविवारची आवृत्ती) / १९८५.१०.२७

मंगरूळकर अरविंद / मराठीतील प्रयोजक प्रयोगाचा विचार / महाराष्ट्र साहित्य पत्रिका/ अंक २३२-३३ / जाने. ते जून १९८५

मुंडले आशा / जेव्हा आदिवासी बोलते होतात तेव्हा / भाषा आणि जीवन / ३:४ / दिवाळी १९८५

मेहेंदळे म. अ. / राज्यात राज्यभाषेतर माध्यमाच्या शाळा असाव्यात का? / भाषा आणि जीवन / ३:३ / पावसाळा १९८५

यादव आनंद / " ग्रामीण भाषेचा वाङ्मयीन प्रवास " / मराठी साहित्य, समाज आणि संस्कृती या लेखसंग्रहात समाविष्ट / मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे ३० / ऑक्टोबर १९८५

यादव आनंद / " साहित्यातील प्रमाण भाषा आणि ग्रामीण भाषा " / समावेश :— मराठी समाज आणि संस्कृती (स्वतः लेखकाचाच लेखसंग्रह) मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे ४११०३० / ऑक्टोबर १९८५

रानडे उषा / पर्याय कोशातील अवतरणे : अर्थनिश्चिती / आलोचना / मे १९८५

लेले वा. के. / 'संभाषणाची वैशिष्ट्ये' / युगवाणी / ४१ : १-२ / जाने-फेब्रु. १९८५

वर्मा प्रदीप / शैक्षणिक गुलागिरी कधी संपणार? (मुलाखतींवर आधारलेला लेख) / लोकप्रभा, मुंबई / १९८५.०८.१८

वऱ्हाडपांडे वसंत कृष्ण / नागपुरी बोली / Souvenir : The fourteenth All India conference of linguists, Nagpur / 1985

वाळंबे मो. रा. / तुमच्या शब्दज्ञानाची कसोटी / ललित / जाने. ८५ (४५), फे. ८५ (४६), मार्च ८५ (४७), एप्रिल ८५ (४८), मे ८५ (४९), जून ८५ (५०), जुलै ८५ (५१), ऑगस्ट ८५ (५२), सप्टेंबर ८५ (५३), ऑक्टोबर ८५ (५४), / ललित / १९८५

वाळंबे मो. रा. / मोडी लिपी व संशोधन / भाषा व साहित्य : संशोधन खंड २ रा

(संपा. जोशी वसंत स. आणि जोगळेकर गं. ना. महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ३०
/ १९८५

वाळुंजकर विकास / विलक्षण छंद जोपासणारा पुण्यातील कबुतरबाजार / सकाळ (पुणे)
/ १९८५ ·०७·१८

संगोराम मिलिंद / कथासिंस याने निचरा ( भाषानिरीक्षण ) / भाषा आणि जीवन / ३ :
२ / उन्हाळा १९८५

संगोराम श्री. दा. / नव्या जबाबदाऱ्यांसाठी पूर्वतयारी : मंथन ( राजभाषा मराठीवरील
लेखांचा संग्रह) ( पुस्तक परीक्षण ) / भाषा आणि जीवन / ३ : ३ / पावसाळा
१९८५

साहा मुरारी / भाषा व शब्दनिर्मिती ( मराठी अनुवाद– सुर्वे कृ. मं.) / महाराष्ट्र
साहित्य पत्रिका / अंक २३१ / ऑक्टोबर, नोव्हेंबर, डिसेंबर १९८४ / प्रसिद्धी
१९८५·०२·२०

सुर्वे कृ. मं. ( अनुवादक ) / भाषा व शब्दनिर्मिती / मूळ लेखक : साहा मुरारी /
महाराष्ट्र साहित्य पत्रिका / अंक २३१ / ऑक्टोबर – नोव्हेंबर – डिसेंबर १९८४
प्रसिद्धी १९८५ · ०२ · २०

सोहनी गुरुदत्त शंकर / कॉम्प्यूटरच्या अंतरंगाचा सोप्या भाषेत परिचय (पुस्तक परीक्षण)
/ या कॉम्प्यूटरमध्ये दडलंय काय ? (ले. राजीव साने) या पुस्तकाचे परीक्षण /
भाषा आणि जीवन / ३ : ४ / दिवाळी १९८५

हातकणंगलेकर म. द. / कानडी – मराठी भाषा आणि जी. एं. ची कथा / महाराष्ट्र
साहित्य पत्रिका / अंक २३४ / जुलै ते सप्टेंबर १९८५

**कशाला काय म्हनू नही**

एक भिक्षू मठपतींना विचारता झाला : जप करताकरता मी धूम्रपान करू शकतो का ?

उत्तर आले : नक्कीच करू शकत नाहीस.

दुसरा एक भिक्षू मठपतींना विचारता झाला : धूम्रपान करता करता मी जप करू शकतो का ?

उत्तर आले : नक्कीच करू शकतोस.

## पत्रिकेबद्दलचे वार्षिक निवेदन

'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' या नियतकालिकाची मालकी आणि इतर बाबी यांच्यासंबंधी निवेदन (वृत्तपत्रे आणि पुस्तके नोंदणी अधिनियम, कलम १९ डी (बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली १९५६, नियम ८, नमुना ४ यांना अनुसरून फेब्रुवारी संपल्यानंतर प्रकाशित झालेल्या पहिल्या अंकात द्यायचे असते ते निवेदन)

१. प्रकाशन स्थळ : पुणे, महाराष्ट्र.

२. प्रकाशनाची कालनियतता : त्रैमासिक–जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर महिन्यात.

३. मुद्रकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : प्रभाकर नारायण परांजपे, भारतीय

४. मुद्रणस्थळ : संजीव मुद्रणालय, ४६९ सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.

५. संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : प्रभाकर नारायण परांजपे, भारतीय, चिटणीस मराठी अभ्यास परिषद, १/८ आगरकर नगर, पुणे ४११ ००१.

६. संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : अशोक रामचंद्र केळकर, भारतीय, ए–२ परिमल, १२३९ ए आपटे रस्ता, पुणे ४११ ००४.

७. पत्रिकेच्या मालकाचे नाव, पत्ता, एकंदर भांडवलाच्या एक टक्क्याहून अधिक हिश्शाचे भागीदार किंवा भागधारक, त्यांचे पत्ते : मराठी अभ्यास परिषद १/८ आगरकर, पुणे ४११ ००१.

मी प्रभाकर नारायण परांजपे, असे प्रतिज्ञापूर्वक सांगतो की, वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

पुणे १ एप्रिल १९८६

प्रभाकर नारायण परांजपे
प्रकाशक

## लेखकांसाठी सूचना

मुद्रणप्रत हस्तलिखित असो किंवा टंकलिखित असो पण ती सुवाच्य व पानाच्या एकाच बाजूस असावी. (उदाहरणार्थ सर्व टिंबे ठळक काढावी, खोडलेल्या अक्षरांची दुरुस्ती करताना गिचमीड टाळावी, शाई पसरलेली कार्बनप्रत पाठवू नका.) सर्व पाने सारख्याच आकाराची असावी, पानाचा आकार फूलस्कॅप चतुष्पत्री ( ८$\frac{१}{२}$ × ६$\frac{३}{४}$ इंच, २१.५ × १८.५ सेंटिमीटर ) यापेक्षा लहान नसावा, शक्यतो पानाचा आकार फूलस्कॅप द्विपत्री ( १३$\frac{१}{३}$ × ८$\frac{१}{३}$ इंच, ३७×२१.५ सेंटिमीटर ) असावा. पाने एकत्र बांधायला टाचणी किंवा क्लिप पुरे, ती पक्की शिवू किंवा स्टेपल करू नयेत. ओळीओळीमध्ये आणि पानाच्या चारही बाजूला व्यवस्थित अंतर असू द्या. थोडक्यात गबाळेपणा टाकून मुद्रणप्रत तयार करावी, पाठवण्यापूर्वी स्वतः एकदा तपासून पाहावी, आणि संपादक मुद्रक यांचे काम सोपे करावे.

लेखासोबत चित्रे, आकृत्या, कोष्टके इत्यादी सामग्री द्यायची झाल्यावर ती मजकुराच्या पानावर न टाकता स्वतंत्र पानावर मुद्रणप्रतीच्या शेवटी जोडावी. अर्थात् त्यांच्यासोबतचा खुलासेवजा मजकूर, कोष्टकाचा मथळा इत्यादी सामग्रीच्या बरोबरच रहावा. मुख्य मजकुरात. योग्य जागी वाचकांच्या आणि मुद्रकांच्या माहितीसाठी कंसात चित्र (आकृती) कोष्टक १/२... पहा ' अशी सूचना अवश्य टाकावी.

लेखन टोपणनावाने प्रसिद्ध करायचे असो वा नसो, पण लेखनाच्या शेवटी थोडी जागा सोडून लेखकाने आपले नाव आणि पत्रव्यवहाराचा संपूर्ण पत्ता द्यावा. व्यावसायिक पत्ता वेगळा असला तर तोही नीट द्यावा. नावामधली आद्याक्षरे इंग्रजी लेखनाप्रमाणे न देता मराठी लेखनाप्रमाणे द्यावी. पत्ते पिनकोडसह द्यावे.

शक्यतो निर्णय एक महिन्यात कळवला जाईल. शक्यतो स्वतःजवळ एक जादा प्रत ठेवावी. अस्वीकृत लेखन पुरेसे टपालहशील पाठवल्यास परत केले जाईल. अनावश्यक पत्रव्यवहार टाळावा अशी लेखकांना नम्र विनंती आहे.

लेखाची शब्दमर्यादा ५००० शब्दांपर्यंत ठेवावी. जर तेवढ्या मर्यादेत विषयाला न्याय मिळणार नाही असे वाटले तरच त्या शब्दमर्यादेत बसतील असे दोन किंवा तीन लेखांक पाडून लेख पाठवावा. ही पत्रिका केवळ तज्ज्ञांनी तज्ज्ञांसाठी लिहिलेला मजकूर देणारी पत्रिका नाही हे लक्षात घेऊन लेखाची भाषा शक्यतो सोपी आणि नेमकी ठेवावी, सैद्धांतिक चर्चा असेल तिथे परिचयातील उदाहरणे द्यावी, पारिभाषिक संज्ञा वापरल्या तर त्यांचा अर्थ सोप्या शब्दात उलगडून द्यावा, केवळ कंसात इंग्रजी प्रतिशब्द देणे पुरेसे मानू नये. (पत्रिकेच्या सर्वच वाचकांना इंग्रजी भाषा येते असे नाही.)

परीक्षणे लिहू इच्छिणाऱ्यांनी संपादकाशी संपर्क साधावा.

पत्रिका केवळ भाषिक प्रश्नांचा कणखरपणाने आणि चिकाटीने सामना करण्यासाठी

नाही तर ती शिवाय भाषाव्यवहारातले लावण्य आणि गंमत यांचा आस्वाद घेण्यासाठी किंवा भाषाव्यवस्थेबद्दलचे निखळ कुतूहल शमवण्यासाठी देखील आहे याचे भान असू दे. अमूक लेखन पत्रिकेच्या विषयप्राप्तीमध्ये बसेल की नाही याबद्दल शंका असल्यास संपादकांना लिहावे. पानपूरकांसाठी मजकूर पाठवला तर त्याचे स्वागतच आहे.

लेखनाला आधारभूत असा संदर्भ, लेखकाचे किंवा संपादकाचे नाव, शीर्षक, लेखकाच्या जोडीने संपादक किंवा अनुवादक असल्यास त्याचे नाव, उगमस्थळ, प्रकाशन स्थळ, प्रकाशक, प्रकाशनवर्ष असा पुरावा द्यावा म्हणजे जिज्ञासू वाचकांची सोय होईल. एकच संदर्भ पुन्हा द्यायचा झाला तर कित्ता, तत्रैव इत्यादी शब्दांची योजना न करता अत्रे १९५३ किंवा अत्रे १९५३ : पृ. १३ अशी वापरायला अधिक सोपी पद्धत अनुसरावी.

## दुरुस्ती आणि पुस्ती

भाषा आणि जीवन ३ : ३ पावसाळा १९८५ पृ. १७ ओळ १ ली शेवटचा शब्द 'वय' ऐवजी 'मन' असा वाचावा.

अंक ३ : ४ दिवाळी १९८५ पृ. ३० वरील '२ क्ष = क्ष + य' या शीर्षकाच्या पानपूरकात ३ ऱ्या ओळीत 'अहनी' याचा अर्थ 'दोन दिवस' असे वाचावे. अहनी शब्द गळलेला आहे. चौथ्या ओळीत 'आणि **रोदसी** याचा अर्थ दोन स्वर्ग ऐवजी पृथ्वी–स्वर्ग असा' असे वाचावे. रोदसी शब्द गळलेला आहे.

## महाबँक भाषाविषयक-लेखन-पारितोषिक १९८५

१९८३ व १९८४ या वर्षांतील भाषाविषयक लेखनासाठी वरील पारितोषिक द्यायचे होते. त्यासाठी डॉ. गं. ना. जोगळेकर ( निमंत्रक ), प्रा. ग. प्र. प्रधान, श्रीमती आशा मुंडले यांच्या परीक्षणसमितीने चिरस्मृत डॉ. सुहासिनी लद्दू ( १९२९-१९८१ ) यांच्या **मराठीच्या प्रमाणभाषेचे स्वरूप** (पुणे : महाराष्ट्र-विद्यापीठ-ग्रंथनिर्मिति-मंडळासाठी कॉंटिनेंटल प्रकाशन, १९८३) या पुस्तकाची एकमताने निवड केली आहे.

पुस्तक हस्तलिखित स्वरूपात महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्था, पुणे यांच्या प्रबंधस्पर्धेसाठी सादर करण्यात आले होते आणि त्याला स्पर्धेत प्रथम पारितोषिक १९७९ मध्ये मिळाले होते. लेखिकेच्या स्मृतीला अभिवादन !

## कानी [ न ] पडलेला संवाद

" बाई, तुम्ही ' लाइट-मशीनगन ' शब्दाचे हे काय भाषांतर करून ठेवले आहे ?"

" का बरं ? ' लाइट-मशीनगन्स ' म्हणजे ' दिवे लावलेल्या बंदुका ' नव्हे का ?"

" नव्हे."

" मी तरी काय करू ? माझे मिस्टर काही मिल्ट्रीत नाहीत, नाही तर त्यांना विचारलं असतं. मला वाटलं की अंधारात दिसावं म्हणून बंदुकींना दिवे लावून घेतले असतील त्यांनी !"

ऐकणाराची वाचा बसल्यामुळे कानी पडणारा संवाद इथेच थांबला. पण ऐकणारा जरा खंबीर दिलाचा असता तर ?

" बाई, अर्थ माहीत नसला तर शब्दकोश वगैरे पाहतात ना ?"

" खरंच की, मला वाटलं — "

" ?"

" माझ्यासारखी संसारी बाई नवीन माहिती पैदा करायला नवऱ्याखेरीज कुणाकडे जाणार ?"

" बाई, स्त्रीमुक्ती हा शब्द तुमच्या कानावरून गेला असणार... "

" असं वाटतं खरं, तो शब्द मात्र मी शब्दकोशात काढून बघेन हं."

" उत्तम !"

## पैसे भरण्याबद्दल सूचना

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. मनीऑर्डरने किंवा चेकने पैसे पाठविल्यास चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनीऑर्डर कूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम, आणि ती कशापोटी पाठवली ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास तसा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत २ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

## पत्रिकेची वर्गणी

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. सध्यातरी त्यांची आकारणी वर्गणीच्याच दरात करण्यात येते. ती पुढीलप्रमाणे :

चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षाला ३० रु.

चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यांसाठी वर्षाला ४० रु.

सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो की मागील वर्षापैकी असो) १० रु.

मागील अंक मागवताना वर्ष १ (१९८३) मध्ये फक्त दोन अंक निघाले, वर्ष २ (१९८४) पासून मात्र दर वर्षाला चार अंक निघाले हे लक्षात घ्यावे.

## परिषदेची वर्गणी

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यांपैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला तर इतर सभासदांनी केवळ १५ रु. भरावयाचे आहेत. उदाहरणार्थ एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ३० रु. + १५ रु. भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी २०० रु. (परदेशी अंक पाठवायचा असल्यास शिवाय १०० रु.); देणगीदारासाठी ५०० रु. किंवा जास्त; आश्रयदात्यासाठी १००० रु. किंवा जास्त. (आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

## जाहिरातीसाठी दर

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु., आवरणपृष्ठ चार १००० रु., आवरणपृष्ठ दोन । तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

नोंदणी क्रमांक : 040048/83

*Introducing a new series of Marathi teaching materials for the use of English-knowing learners whether Indian or non-Indian*

MARATHI STRUCTURAL PATTERNS : BOOK ONE

Illustrative and practice materials, introduction to grammatical structures and some everyday communication and vocabulary woven into 32 convenient units. 470 pages; 1982; Rs 150

MARATHI CONVERSATIONAL SITUATIONS

Fourteen conversations ranging from Getting acquainted to Meeting officials. 248 pages; 1983; Rs. 90

MARATHI READINGS

Twentifive adult reading units to complement and follow the preceding, coverring narration, description, letterwriting, and other modes. 89 pages; 1983; Rs 50

MARATHI VOCABULARY MANUAL

MARATHI ILLUSTRATED VOCABULARY

Companions to the rest : Classified Marathi-English English-Marathi Vocabularies. 86 pages; 1983; Rs. 75. 45 pages; 1983; Rs. 35

Handsomely produced set in Crown Quarto (9½"×7½"); Rs 400 for the set; more volumes to follow to cover more advanced stages.

The authors, Dr. Maxine Berntsen and Jai Nimbkar, have brought their extensive experience and knowledge of traditional as well as modern methods to bear on this collaborative effort to fill a serious gap. The recent realization of the need for the teaching of Marathi as a second language has made all of us acutely aware of the paucity of such carefully prepared materials that can be used in the classroom as well as in a 'self-taught' or 'tutorial' approach.

Available from the publishers : (1) Marathi Abhyas Parishad (2) Granthali, 34 902 Nehrunagar, Bombay 400 024. Also from: International Book Service, Deccan Gymkhana, Pune 411 004.

Libraries get a 10% discount; members of Parishad or Granthali get a 50% discount. Outstation cheques should add Rs. 2 towards collection charges.